माणूस नावाचा खेळ (कादंबरी)

लेखक - सुभाष नारायण

09870801338

subhash.narayan30@gmail.com

66, 1/1, bharat nagar, mankhurd, mumbai

प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

मुखपृष्ठ , मांडणी आणि सजावट : सुनिल सामंत

www.esahity.com

esahity@gmail.com

eleven th floor, eternity
eastern express highway
Thane, 400604

प्रिय किरण पवार सर

यांना

तुमच्यामुळे अवघड गोष्टी सोप्या झाल्या

--सुभाष

माझा जन्म झाला तेव्हा खरं म्हणजे मला कळलंच नाही कि, मी जन्माला आलोय. ते कळण्याचं वयच नव्हतं म्हणा. मी जन्मलो त्यात माझं स्वत:चं कर्तृत्व असं काहीच नव्हतं, कसं असणार म्हणा. पण तसं ते आईवडीलांचंही कर्तृत्व नव्हतं कारण त्यांनी स्वत:च्या शरीराची भूक भागवली आणि त्यांनी केलेल्या या अशा गंमतीतून माझा जन्म झाला.



आता मी वय वर्षे ३१ चा. यातही माझं स्वत:चं कर्तृत्व नाहीच. कारण मेलो नाही म्हणून इतकी वर्षे जगलो हे उघड आहे. त्यातही दुसरी गोष्ट अशी कि हे मात्र घरच्यांचं कर्तृत्व. त्यांनी मला जगवलं आणि जगलो मी इथपर्यंत. त्यातही माझ्या आईवडीलांना दुसरा आधारच नाही म्हणून त्यांनी मला जगवलं असं म्हणा हवं तर. दुसरं मुल झालंच नाही त्यांना असं समजू नका, ते करतच असतील गंमत नेहमी, त्यातून मला झाला एक भाऊ. नऊच दिवस जगला बिचारा. नऊ महीने नऊ दिवस पोटात आणि नऊ दिवस बाहेरचं जग इतकाच त्याचा प्रवास. सर्वांनाच खुप वाईट वाटलं. त्याला स्वतःलाही खुप वाईट वाटलं असेल पण मेल्यानंतर वाईट वाटून काय उपयोग.

मी काहीच काम करत नाही म्हणून माझे आईवडील बऱ्याचदा काळजीत असतात. याबाबतीत आई जरा जास्तच काळजी करते. पण ती मला एकही शिवी घालत नाही. म्हणून मला तिचं काहीच वाटत नाही. वाटतं ते बाप नावाच्या प्राण्याचं. अहो भलताच भलता माणुस आहे हो तो. मला बहीण नाही तरी हा चक्क आईबहीणीवरून शिव्या घालतो मराठीत. आईवरून तर जास्तच शिव्या घालतो, तेही समोर आई असताना. आईला याबद्दल बिलकुल वाईट वाटत नाही ही दुसरी नवलाची गोष्ट. आईच्या जागी मी माझ्या बापाची बायको असतो तर दोन दिवस जेवणच दिलं नसतं. उपाशीपोटी शिव्या थोडीच जन्मल्या असत्या.

*****

तीन चार महीन्यांपुर्वी एका चौदा वर्षाच्या मुलीवर तिच्याच मोठ्या भावाच्या मित्राने बलात्कार केला. तिचा भाऊ घरात नव्हता आणि घरात ही बिचारी एकटीच. भावाच्या मित्राने तिला चहा करायला सांगितला आणि चहा प्यायचा सोडून तिच्यावर बलात्कार केला आणि तिथून पळून जाऊन कुठेतरी लपून बसला. मुलगी बिचारी दहाव्या दिवशी जगाला कायमचं सोडून गेली. तो बलात्कार करणारा बावीस दिवस उलटून गेले तरी पोलीसांना सापडेना. मग आम्ही मुलामुलांनी पोलीस स्टेशन समोरच आंदोलन सुरू केलं. आंदोलन म्हणजे नुस्तं चटईवर बसून रहायचं. हातात निषेधाचे फलक. पोलीसांना भयानक प्रेशर आलं. आंदोलनाच्या तिसऱ्याच दिवशी तो मुलगा सापडला. त्याला त्याच्या घरच्यांनीच एका नातेवाईकाकडे लपवला होता. त्याच्या घरचेही त्याच्याएवढेच नालायक असतील असं वाटलं नव्हतं. आई बाप पांघरुण घालतायत म्हंटल्यावर मुलगा असं करणारच. मला तर त्याच्या आईवडीलांनाही शिक्षा व्हावी असं वाटत होतं पण शिक्षा फक्त मुलालाच झाली. कायद्यापुढे आपलं काहीच चालत नाही हेच खरं. हे सगळं नंतरचं, आंदोलन संपल्यावर मी घरी आल्यावर बापाने मला मी कुळ बुडवत असल्याची माहीती दिली आणि आईसमोरच आईवरून तीन सडसडीत शिव्या दिल्या. तुझ्यासारख्याची माझ्या घरात

रहायची लायकी नाही असं म्हणून स्वतःच घरातून निघून गेले. जाताना पुन्हा एक शिवी दिली आणि निघून गेले. या अशा शिव्या दिल्यावर आपला बुडवलेलं कुळ पुन्हा तरंगतं कि काय हे एकदा बापाला विचारेन कधीतरी.

*****

तुम्हाला सांगायचं राहून गेलं कि मी असा आंदोलनात वगैरे सहभागी होतो नेहमीच. कॉलेज संपायला आणि आंदोलनात सहभागी व्हायला सुरू होणं एकाच वेळी. त्याही आगोदर शाळेत असताना असा विचार कधी मनात आला नव्हता. शाळेत असताना वाटलं होतं कि मास्तर वगैरे व्हावं. ( सभ्य भाषेत शिक्षक वगैरे) पण ते होण्यापेक्षा हे असं सामाजिक कार्यात सहभागी होणं सोप्पं म्हणून मी इकडे वळलो. तर नंतर लक्षात आलं कि हे तर फारच अवघड आणि जोखमीचं काम. त्यात आपण नेमकं काय करतोय हे लोकांना जाऊद्या घरातल्यांनासुद्धा कळत नाही. काही जण तर याला सामाजिक उपद्व्याप म्हणतात. असो, पण अजुनही माझ्या आयुष्याची घडी बसली नाही. ती पटकन बसायला हवी असं माझ्या आईला वाटतं. आणि घडी बसणं म्हणजे नेमकं काय असं विचारल्यावर कळलं कि माझं लग्न झालं कि आपोआप घडी बसेल. आता लग्न हा काय विनोदी प्रकार आहे हे मला कळलं नाही. कारण आपल्याकडे ज्यांना एकमेकांशी लग्न करायची आहेत त्यांना करु दिली जात नाहीत आणि मुलगी दाखवण्याचा काहीतरी भंकस कार्यक्रम करून लग्न ठरवली जातात. हि काय फालतूगिरी आहे, किती नकली जगतात हि माणसं. म्हणजे मी हे बोलतोय ( किंवा लिहीतोय ) कारण मी प्रेमात वगैरे पडलो असेन असं वाटत असेल तर तो विचार मनातून डिलीट करा कारण तसं काही नाहीये. म्हणजे कधी प्रेमात पडण्याच्या विचारात देखील पडलो नाही.

म्हणजे कॉलेजमध्ये असताना एक मुलगी पडली होती प्रेमात. फारच जाड आणि शरीराने बेढब. आपण शहरातून गावी जाताना एकाद्या गोणीत भांडी भरल्यावर गोणीचा जसा आकार होईल तसा तिच्या शरीराचा आकार, तर मला वाटलं कुणीतरी मित्राने मला फसवण्यासाठी डाव रचला असावा म्हणून मग तीन दिवस तिच्यावर पाळत ठेवली पण कॉलेजच्या वेळेत अथवा ती क्लासवरून घरी जाताना कुठेच माझ्या मित्रापैकी कुणीच भेटलं नाही. मला खुपच वाईट वाटलं स्वतःचंच.

चौथ्या दिवशी ती पुन्हा येऊन विचारू लागली कि काय विचार केलाय तर मी तीन दिवस तिच्या मागे हेरगिरी करण्यात घालवले, विचार काय करणार. पण तिच्या बाबतीत विचार काय करायचा, मी तिला सॉरी म्हटलं तर ती निघून गेली. नंतर मला कळलं कि तिला मित्र मैत्रिण कुणीच नाही म्हणून मग मी तिच्याशी गट्टी जमवली पण नंतर अजुन कळलं कि ती एका बिल्डरची एकुलती एक मुलगी. खुप लाडावलेली, पण आई नसल्याने एकटी पडलेली.

असो, शेवटचं वर्ष असल्याने आमची गट्टी फार काळ टिकली नाही. गेल्या वर्षी वर्तमानपत्रात वाचलं कि तिने आत्महत्या केली. तिचा बाप शहरातला नामांकित बिल्डर म्हणून बातमी छापून आली. नाहीतर मला कळलंही नसतं कि असं काही झालंय म्हणून. पण ती गेल्याचं मला बिलकुल वाईट वाटलं नाही, म्हणजे इतक्या वर्षांनी हे असं झाल्यामुळे असेल कदाचित. पण मग ती तेव्हाच मेली असती तर वाईट वाटलं असतं का तर तेही मला ठरवता येईना. नवलच आहे माझं, इतका कोरडा मी कधी झालो कळलंही नाही मला. आपल्याच बाबतीत घडणारी घटना आपल्यालाच कळु नये, दुर्दैवाची गोष्ट आहे ना ही? पण मला वाईट वाटलं नाही हे नक्की. मी त्या दिवशी एक मस्त सिनेमा पाहीला, आणि पाणीपुरीपण खाल्ली. नंतर काही दिवसांनी कळलं की तिचा बाप पण कुठेसा निघून गेला सगळं काही सोडून. मी त्या मुलीला तेव्हा हो म्हटलं असतं तर सगळं माझं झालं असतं आता. माझ्या बापाला कुळ स्वर्गात पोहचल्याचा आनंद झाला असता कदाचित. पैसा पाहिला कि सगळेच नकली होतात. मी असले भयानक विचार करू लागलो कि मला वाटायचं आत्महत्याच केली पाहिजे, पण नुस्तं वाटून काहीच होत नसतं हे मात्र नक्की.



*****

मी नोकरी करायचा प्रयत्नही केला पण कुणाचंतरी ऐकत मुकाट्याने काम करणं तेही मान खाली घालून हे म्हणजे आपण स्वतःचा बैल केल्यासारखंच की. बैल करतो ते काही वाईट नाही पण आपण थोडीच बैल आहोत. घाण्याला जुंपा, औताला जुंपा नाहीतर बैलगाडीला जुंपा आपण आपलं तोंडातून फेस गळेपर्यंत चालायचं, कुठवर तेही, माहित नाही तर मग का चाला? म्हणून तीन नोकऱ्या सोडल्या. आणि आता सामाजिक चळवळीत भाग घेत असलो तरी मला काही सामाजिक भान आहे असं बिलकुल नाही पण ते काम करताना मला खुपच समाधान मिळतं म्हणून मी ते करतो. पण मी काहीतरी करावं असा चंगच माझ्या बापाने बांधलेला. गेल्या महीन्यात त्याने मला सांगितलं कि किमान सकाळी ४ ते ७ या वेळेत कांदेपोहे, शिरा हे तरी विकून काहीतरी कमव नाहीतर घरातून चालता हो. तर मी आपला ६:३० पर्यंतच थांबेल म्हणालो. उगाचंच बोलायचं म्हणून बोलून गेलो आणि मग स्टेशनशेजारी एक गाडी मांडून सुरू केलं काम. सोबत अजुन एक मुलगा होता म्हणून मला इतका त्रास होत नाही. मीपण मन लावून हे सगळं करतो आणि आई मी काहीतरी करतोय म्हणून हे सगळं मनापासून बनवते. पण तिच्या मनात माझं लग्न पटकन उरकायचा डाव सुरूच असेल की.

*****



आता मी हे कांदेपोहे विकण्याचं काम करतोय म्हणून बापही शिव्या घालणं सोडून मला रोज काही ना काही शहाणपणाच्या गोष्टी सांगतो, बरं हे सांगतोही नेमकं जेवताना त्यामुळे ऐकण्याशिवाय पर्यायच नसतो. दिवसा तो कामाला जात असल्याने दिवस बरा जातो माझा, त्यात कुठे पथनाट्य करा, कुठे स्वच्छता मोहीम राबवा अशासारखी टाईमपास समाजसेवाही सुरूच असते की.

*****

एक दिवस दुपारी घरी गेलो तर मामा आलेले दिसले. मामा आणि माझा बाप काहीतरी विनोद करून मोठमोठ्याने हसत होते. मी गेल्यावर एकदम गंभीर झाले. मला दोघांचीही खुपच किव आली. मी आल्याने स्वतःचा विनोद का मारावा त्यांनी? मामा अगदी गंभीर चेहऱ्याने मला म्हणाले कधीतरी गावी पण येत जा. मी आपलं सकाळच्या कांदापोह्याचं निमित्त पुढे केलं. ते म्हणाले कांदेपोहे खायलाच बोलावतोय आणि बाप आणि मामा मोठ्ठ्याने हसु लागले. नंतर एकमेकांशी बोलु लागले. तसं मला कळलं कि माझ्या लग्नाचा विषय हे दोघे मिळून बोलत होते. मला स्वतःचा भयंकर राग आला. मी आईला जाऊन हे सांगितलं तर ती म्हणाली बाईमाणुस मी, मी काय पुरूषांत बोलणार. बाई असलीस तरी माणूसच आहेस ना तू! हे सामाजिक वाक्य मी बोलल्यावर ती फक्त एवढंच म्हणाली कि मला त्यातलं काही कळत नाही. पण हिला कळत नसतं तर मग उगाच का एवढी मोठी झालीये का ही? माझ्यापेक्षाही मोठी असून माझ्याएवढंही कळत नाही हिला. मी त्याच तिरमीरीत घरातून आईकडून हजार रूपये घेतले आणि बाहेर पडलो.

*****

संध्याकाळ झाली तरी माझ्या डोक्यातून लग्नाचा विषय जात नव्हता, माझं कुणावर प्रेम नाही हे तर तुम्हाला माहितच आहे पण माझ्या मागे आणि समोरसुद्धा मला न विचारता माझं लग्न ठरवतात हे खुपच मागासलेलं वाटलं मला. त्यात मला लग्नच करायचं नाहीये हे आईलादेखील माहित असून तीही गप्पच बसली. एकदा तिला मी सांगितलेलं कि मला लग्नच करायचं नाही तर मेल्यानंतर तुळशीबरोबर लग्न लावून मगच अग्नी द्यावा लागेल म्हणाली. मी तेव्हा तिला म्हणालो कि मी मेल्यानंतर माझं लग्न तुळशीबरोबर लावून द्या नाहीतर एखाद्या माकडीणीशी लावून द्या, मला काय त्याचं? पण आता किंवा इथुन पुढे माझ्या लग्नाचा विषय काढु नका तर आई ९ दिवस माझ्याशी बोलली नाही. पण दहाव्या दिवशी बोलली तेही माझा बाप त्या आगोदर दोन दिवस घरी आला नाही म्हणून तिने मला धावपळ करायला सांगितलं. बाप आणि आईचं माझ्या लग्नावरूनच बोलणं झालं होतं दोन दिवसांपुर्वी आणि आईने लग्नाबद्दलचे माझे विचार बापाला सांगितल्यावर बाप रागावून निघून गेला होता. आईने माझ्याशी बोलणं टाकलेलं त्यामुळे दोन दिवस मला सांगितलंच नाही. पण जीव घाबरा झाल्यावर मग माझ्या न बोलण्याच्या दहाव्या दिवशी मला घडला प्रकार सांगितला. हरवलेला बाप शोधायचा कुठे? मीपण आपला प्रश्नचिन्हात गुरफटलो. पण बाप सापडला आत्याकडे. मी त्याला घेऊन घरी आलो तर आईने बापावरून मीठ मिरच्या ओवाळुन टाकल्या. मी बापाला सांगितलं कि माझ्यावर रागावून जाताय किमान ते मला तरी सांगून जा, मला माहितच नाही तुम्ही रागावला ते. बापाने माझ्या थोबाडीत ठेवून दिली सणसणीत. म्हणजे ह्यांना शोधून आणा ते मार खायला का?

पण आताची गोष्ट म्हणजे निव्वळ भयानक गोष्ट होती. हजार रुपये होतेच जवळ. गेलो एका बारमध्ये. दहा वाजलेले. बारमध्ये ऑर्डर कशी द्यायची तेही माहित नव्हतं. समोर एक फारच गरीब असा माणुस होता. त्याचं पाहून मी तिच ऑर्डर दिली. वेटर घेऊन आला आणि माझं पहिल्यांदा दारु पिणं सुरू. समोरचा फारच गरीब दिसत होता. माझ्या बापाच्याच वयाचा असावा. म्हणजे तसा श्रीमंत असेल तो पण काहीतरी भयानक घडलं असावं असं काहीतरी वाटत होतं. माझं एक-एक घोट घेणं सुरूच होतं. फार कडू असते ही दारु माणसं मजा मारायला पितात. काय मुर्ख असतात ना ही माणसं? त्याने फारच पटकन त्याची दारुची बाटली संपवली आणि दुसरी मागवली. मी जमेल तसं पित होतो.

त्याला माझ्याशी बोलावंसं वाटलं कि काय काही कळलं नाही पण तो बडबडू लागला.
आयुष्य फार वाईट आहे पण हे तर मला माहित होतं, नंतर म्हणाला जगणं फार कठीण आहे तर हेही मला माहित होतं. नंतर म्हणाला मला आत्महत्या करावीशी वाटतेय. मला खुप वाईट वाटलं. एखाद्याला आत्महत्या करावीशी

वाटते आणि तो माझ्यासमोर पोटभर दारू पित बसलाय. सरकारने ठरवून टाकायला हवं कि आत्महत्या करणं गुन्हा आहे तर गुन्हेगाराला मरेपर्यंत फाशीची शिक्षा. मग आत्महत्या करणारा वाचलाच आत्महत्या करताना तरी तो जगण्यातून नक्की सुटेल. पण एखाद्या जीवंत माणसाला मरावसं वाटणं यात संपूर्ण समाजच दोषी म्हणायला हवा. पण तो नंतर खुपच बरळू लागला कि सगळ्या सीमारेषा पुसून टाकणाऱ्या खोडरबरची गरज आहे. किंवा विमानात बसून या जगावर थुंकलं पाहिजे. किंवा प्रत्येक धर्माचे देव जर आभाळात आहेत तर विमानातूनच आभाळावरही थुंकलं पाहिजे. किंवा सगळ्याच धर्मातल्या मुलांच्या डोळ्यावर गांधारीची पट्टी बांधून त्यांचं लग्न कुठल्याही धर्मातल्या मुलींशी करून द्यायला हवं. किंवा राम, अल्ला, बुद्ध आणि येशू हे सगळेच कधीकाळी एकमेकांचे भाऊ होते आणि मग वेगवेगळ्या ठिकाणी जाऊन त्यांनी स्वतःचे धर्म स्थापन केले असा शोध लावून आणि मग भावाभावांच्या भांडणात आपण का पडायचं हेही सरकारने जाहीर करायला हवं. असं बरंच काही बोंबलत होता तो. माणुस दारू प्यायल्यावर फारच जागतिक होतो.

नंतर मग घड्याळात पाहीलं तर बारा वाजायला आलेले. मी बिल भरून निघालो. तर तोही बिल भरून माझ्या पाठोपाठ निघाला. तो फारच लटपटत होता. मला वाटलं त्याला घरी सोडायला हवं म्हणून मी त्याला घराचा पत्ता विचारल्यावर त्याने सांगितलं कि माझ्या घराने मला घरातून बाहेर काढलं. मी म्हंटलं मग आता? त्याच्याकडून काहीच उत्तर आलं नाही. मी मनात विचार केला कि ह्याला एकटं नको सोडायला म्हणून थांबलो त्याच्यासोबत.

*****

"माणुस पुर्वी माकड होता. . . . . चार पायांवर चालता चालता त्याच्या लक्षात आलं असेल कि समोरच्या पायांचा हात म्हणून वापर करायला हवा. . . . . मग शेपटी हळुहळु गायब झाली असेल. . . . पण हि शेपटी असायला हवी होती. . . . का ते माहित नाही पण असायला हवी होती. . साला आपण ना आपलं माकड करून ठेवलय. . . . . माकडा माकडा हुप. . . . तुझ्या शेपटीवर शेरभर तुप. . . . कुत्रा करून ठेवलय आपण स्वतःला. . . . कुत्र्या कुत्र्या हुप. . . . तुझ्यापण शेपटीवर शेरभर तुप. . . . . . . . शेपटीचं तुप चाटत बसा. . . तुप खाल्लं कि रुप येतं. . . . रुप सुंदर असलं कि सुंदर मुलाशी लग्न होतं. . . . . सुंदर ते ध्यान ऊभे कुठेतरी. . दगडांच्या देशात सगळ्याच दगडांनी शेंदुर फासून बसायला हवं. . . . हा. . . . . हा. . . . . . हा. . . . . . जगातल्या प्रत्येक जिवंत माणसाच्या नावापुढे कै. लावायला हवं . कै. अमुक कै तमुकशी रक्त येईपर्यंत भांडले. कै. ढमुकने सातशे रुपयात दोघांचीही मलमपट्टी केली. . . . . . नाचतो गं डोंबारी. . . . . . . मला कुणीतरी गोष्ट सांगा राजा आणि राणीची. . . . . . . . कावळा आणि चिमणीची. . . . . . . . . . हत्ती आणि मुंगीची. . . . . . . . . . टिंगटाँग. . . . . कोण आहे. . . . . . . मी मिस्टर मुंगी. . . . . . . . . . मग फटीतून याना. . . . . हा. . . . हा. . . . हा. . . . . "

रात्रभर असं काहीसं बोलत होता तो. मी ऐकत होतो, दगडासारखा. मला काय व्यक्त व्हावं तेच कळत नव्हतं. पण मी ऐकत होतो. मग रात्रीचे तीन वाजले आणि एका सायकल वाल्याकडून चहा घेतला आणि दोघेही प्यायलो. तसा तो थोडासा सावध झाला आणि फारच कडक इस्त्रीसारखं वागु लागला. तुम्ही मला फारच मदत केली रात्रभर सोबत देऊन, नाहीतर इथे मला बऱ्याचदा लुटलय. थँकयू . . . . भेटुया पुन्हा नक्कीच . . . मला आवडेल तुमच्यासोबत ड्रींक करायला . . . असं गोरंगोमटं बोलला आणि निघून गेला. मी तिथून तडक माझ्या कांदेपोहेच्या गाडीवर गेलो. तिथे त्या सोबतच्या मुलाने सगळी तयारी करून ठेवली होती. मी जाऊन फक्त ऊभा राहीलो. खरं म्हणजे उभं रहायची सुद्धा ताकद नव्हती माझ्या अंगात. घरी आल्यावर मला प्रचंड भूक लागलेली, आणि त्यापेक्षाही डोळ्यावर प्रचंड झोप, तर आईला फक्त माझीच काळजी. मी आईला म्हंटलं काहीतरी खायला दे, तर तिने कांदेपोहे बनवून दिले. आता कांदेपोहेच खायचे तर आमच्या कांदापोह्याच्या गाडीवरच खाल्ले नसते का? पण तरीही निमुटपणे खाल्लं आणि आईला म्हंटलं झोपतो मी. झोपी गेलो, पण झोपेत पण तोंडाला दारूचा वास जाणवत होता. झोपेत असूनही मला माझी लाज वाटायला लागली. मी मनातल्या मनात खुप खजील झालो. मी चांगल्या घरातला मुलगा असूनही असं कसं काय करू शकतो कळलंच नाही. पण चांगलं घर आणि वाईट घर हा काय प्रकार असतो, म्हणजे चांगलं घर नेमकं कशाने बांधतात, कि ते चांगलं होतं? आणि वाईट घर बांधताना वेळ चुकीची असते काय? पण चुकीची वेळ आणि बरोबर वेळ हा काय प्रकार आहे? झोपेत कठून कुठे भरकटलो मला सुद्धा कळलं नाही. हे विचार पण लोळत असतील काय मनातल्या मनात? साला विचार कसे काय लोळतील? ह्या असल्या भंपक विचारात मला झोप कधी लागली कळलीच नाही.

*****

झोपेत स्वप्न पडलं कि काय कुणास ठाऊक? सामाजिक चळवळीतला कार्यकर्ता माझ्या स्वप्नात येऊन मला काहीतरी भयानक घडल्याचं सांगत होता, पण त्याचं बोलणं बिलकुल कळत नव्हतं. तो बिचारा फारच पोटतिडकीने बोलत होता. नंतर निघून गेला आणि जाताना नक्की ये म्हणाला. झोपेतल्या स्वप्नात हे असं सगळं न कळणारं घडलं कि डोकं बधीर होतं. मी आपला बधीर तर आई मला झोपेतून उठवत होती. मी घड्याळात बघितलं, अकरा वाजलेले. आईला म्हटलं दहा मिनीटे झोपू दे. आई बरं म्हणून कपडे धुत बसली. दहा मिनीटांनी ऊठुन बघ तो तर घड्याळात एक वाजलेले. इतक्या उशीरा ऊठण्याची माझी हि पहीलीच वेळ.
आंघोळ करताना आईने सागितलं कि चळवळीतला मित्र आलेला तर साधं ऊठुनही बसता येत नव्हतं काय? आळशी होऊ नकोस. तर मी च्यायला स्वप्नच समजलो कि सत्यघटनेला. डोकं पुसताना लक्षात आलं कि केस भरपूरच वाढलेत. दुपारी जेवताना आईला म्हटलं उद्या केस कापतो पण शनिवारी केस कापायचे नसतात. असं म्हणून आई डाफरली.

*****

संध्याकाळी चळवळीतल्या लोकांना भेटायला गेलो, तिथे आधीच विषय सुरू झालेला. मी त्या घोळक्यात सामील झालो. "नेहमी आपल्यावरच अन्याय का? साला आपण खालच्या जातीचे म्हणून माना गुडघ्यात टाकूनच जगायचं काय? चुक नसतानाही आपण कित्येक वर्ष मार खात आलोय. आपण त्या गावाला जाऊन तिथे आंदोलन करायचंय. " असं म्हणून मग काय करायचं कसं करायचं हे ठरवलं जाऊ लागलं.

मला घडलेली घटनाच माहित नव्हती म्हणून मी अस्वस्थ. थोड्या वेळाने जेव्हा सगळे आपापल्या घरी निघाले तेव्हा मी एकाला विचारलं कि नेमकं काय झालय तर त्याने मला घडलेली घटना सविस्तर सांगितली. घटना अशी होती, "आमच्यातला एकजण जो नेहमीच चळवळीत भाग घ्यायचा. आणि त्यालाच मारलं होतं. का, तर त्याने एका बाईवर डोळा ठेवलेला. आणि वरच्या वर्गातल्या लोकांना वाटत होतं कि ह्या बाईने त्या मुलाला विरोध केलेला. त्या मुलाला मारलं होतं. मारलं होतं तेही अगदी जीवानिशी. त्याच्याच शेतात चार भाग करून त्याचं प्रेत फेकलं होतं. आणि ही घटना अगदी संघटित पद्धतीने घडली किंवा घडवली गेली होती. बरं खालच्या जातीतल्यांची घरं फारच कमी तर वरच्यांची घरं खुपच जास्त. पोलीस कुणाविरूद्ध तक्रार नोंदवायलासुद्धा वेळ घेत होते. तपास करू, बघू, आम्हाला कर्तव्य कळतं असं म्हणून काहीच हालचाल करत नव्हते. "
सविस्तर घटना कळल्यावर मला पाणीच प्यायला लागलं इतका आतून रिकामा झालो मी. माणुस माणसाला प्राणी असताना मारायचा, मग अजुनही आपण प्राणीच आहोत का बिनविचारी. पण बिनविचारी असतो तरिही असलं कृत्य घडलं नसतं. साला विचारच माणसाला प्रगल्भ करतो आणि विचारच माणसाला भयानक बनवतो.

आपण जगतोय तसेच इतरही जगतात, आपल्याला ठेच लागल्यावर रक्त येतं तसंच ते इतरांनाही येतं, आपल्यावर कुणी वार केल्यावर आपण जितकी मोठी किंकाळी मारु शकतो तसंच इतरही किंकाळी मारु शकतात, आपल्याला मारल्यावर आपल्या घरच्यांना जितकं दुःख होऊ शकतं तितकंच दुःख इतरांच्याही घरच्यांना होऊ शकतं, असा अनेक गोष्टी आपल्या आणि इतरांच्या सारख्याच असतात पण तरिही ही भयानकता का? आपण विचार करणं सोडलंय कि विचारच कुठे तरी लांब पळून गेलेत आपल्यापासून? इतरांचं रक्त पाहील्यानंतर घरी जेवताना रक्तच पिण्याचा भास होत नसेल का यांना? बरं ज्याचा एवढा अभिमान बाळगला जातो आणि ज्याच्यासाठी मातीपण खायची तयारी असते ती जात म्हणजे नेमकं काय प्रकरण आहे? हे प्रकरण कशाशी खातात कि हे खाण्यासाठी माणसालाच मारावं लागतं?

*****

जातीतून जन्म तुझा जातीतच अंत रे. माणसाच्या डोक्यातून काही केल्या जात नाही ती जात. माझी जात कोणती? माझी आणि माझ्या बापाची जात एकच आहे का? पण माझा जन्म झाल्यावरमाझ्या बापाला माझी जात नेमकी कळली कशी? कि माझ्या बापाने स्वतःचीच जात मला चिटकवली? विचारांनी मेंदु खाल्ला जाईल असं वाटत होतं. आई म्हणाली एवढा कसला विचार करतोयस तेव्हा मला कळलं कि मी घरी आलोय. आई सकाळच्या कांदापोह्याची तयारी करत होती, तर बाप टिव्हीवर तेच जातीवरून घडलेलं प्रकरण बघत बसला होता. मला एक बहीण असायला हवी होती. माझ्यापेक्षा मोठी. मला तिच्या समोर व्यक्त तरी होता आलं असतं. एखादा पुतळा बनवून घ्यायला हवा. किंवा एखादी बाहुली घ्यायला हवी, त्यांच्यासमोर तरी व्यक्त होता येईल कदाचित.

सकाळी तीनलाच उठलो तर आईचं काम सुरूच होतं. हिच्या शरीराला आराम मिळत नाहीच. दुपारी झोपते थोडसं. कांदेपोहे, शिरा घेऊन निघालो चार वाजता. सोबत रोजचा मुलगाही होता. ह्या मुलाचं एक वैशिष्ट्य होतं कि हा बिलकुल बोलत नाही. मला तर हा मुकाच वाटला सुरवातीला. पण एकदा ठेच लागल्यावर आईगं बोलला आणि हा बोलु शकतो हे कळलं. पण हा बोलतच नाही फारसा. माणसं मोबाईलवर खेळत कांदेपोहे, शिरा खात होती. चहा पित होती. आणि मोबाईलसकट आपापल्या प्रवासाला निघून जात होती. काळी, गोरी, नकटी, बुटकी, उंच, तरुण, थोराड, स्त्री, पुरूष, शहाणी, वेडी, खरी, खोटी, असली, नकली माणसं. रोजच जातात इथुन. साडेसहा झाले आणि आम्ही निघायच्या तयारीत तर तो बारमध्ये भेटलेला माणुस आला. मित्रा म्हणून मला जोरात मिठी मारली आणि माझ्या गालावर स्वतःचे गाल घासले, त्याच्या तोंडाला दारूचा वास फार भडक येत होता. माणसाने इतकं अस्सल असायला हवं खरं तर. एखाद्याला मारावीशी वाटली मिठीतर बिनदिक्कत मारावी. मी मग बारमधल्याला पोहे दिले खायला. आणि पैसेही घेतले नाहीत, तर तो पटकन खुश झाला. दारू उतरली नव्हती बिचाऱ्याची. तो निघून गेला आणि जाताना भेटतो उद्या म्हणाला. पण आज संध्याकाळी आम्ही चळवळीतले सगळे आंदोलनासाठी खेड्यात जाणार होतो. त्याला सांगायला हवं होतं मी उद्यापासून तीन दिवस नाही ते. पण तो तर गेलाच निघून. आम्हीपण निघालो घरी तर मी माझ्या सोबतच्या मुलाला सांगितलं मी नाहीये तीन दिवस तर तो हो म्हणाला, मी सांगितलं तुला एकट्यालाच सांभाळावं लागणार, तर हो म्हणाला. अंधारातून स्टेशनपर्यंत एकट्यालाच यावं लागेल तर हो, जास्त दगदग करू नकोस तर हो, रस्त्यातून येताना कुत्री चावतील हा पठ्ठ्या तरीही हो म्हणाला तसा मी चवताळलोच कुत्र्यासारखा, म्हणालो सगळ्याच गोष्टींना हो कुठे म्हणतोस, कुत्री चावतील तर तू नाही चावणार म्हण, तर हा पुन्हा हो म्हणाला. तर माझ्याकडे कपाळावर हात मारण्या शिवाय पर्यायच शिल्लक राहीला नव्हता. मी सकाळीसकाळी कपाळावर हात मारून घेतला तर हा पठ्ठ्या भिंतीजवळ शांतपणे लघवी करत होता.

*****

संध्याकाळी घरी आलो तर घरून निघण्यासाठी तयारी करू लागलो.
आईला म्हंटलं, "तीन दिवस येत नाही. "
तर आई काळजी करत, "लवकर ये" म्हणाली
मी म्हंटलं येतो, "चौथ्या दिवशी. "
तर, "हो" म्हणाली.



आणि डबाभर लाडू, चकल्या आणि शंकरपाळ्या कोंबल्या बॅगेत, तसा मी भैसटलो.
"दिवाळी नसतानाही हे भलते उद्योग करतेस आणि वर निघताना माझ्याच बॅगेत कोंबतेस? "
तर म्हणाली, "काळजी वाटते. "
घ्या, म्हणजे चकल्या, लाडू, करंज्या घेऊन गेल्यावर हिची काळजी कमी होणार आहे का? मी तो डबा तसाच बाहेर काढून ठेवला,
आईला सांगितलं, "मला असलं काही नकोय. "
ती म्हणाली " तुझ्याकडे मोबाईल तरी असायला हवा होता, बोलता तरी आलं असतं. "
मी पुन्हा वैतागलो आणि बॅग घेऊन तडक घराबाहेर पडलो.
नंतर मनात विचार आला, च्यायला पुरूषांचं जरा बरं असतं, घरात कुणाचा राग आला की तडक बाहेर पडता येतं. पण स्त्रियांचं काय? राग आलाच कुणाचा तरी रडण्याशिवाय काहीच पर्याय नसतो. आणि गेलीच कुठली स्त्री तर तिच्यावर आयुष्याभर संशय घेणारेही कमी नाहीत.

*****

गाडीत बसलो तेव्हा गाडीत माणसं असूनही भयाण शांतता होती. प्रत्येकाचा चेहरा काहीतरी बोलू पहात होता. पण व्यक्त करण्याची इच्छाच होत नसावी कुणाची. डोळे बंद करूनही झोपच येत नसावी कुणाला. खड्ड्यातून गाडीचा प्रवास झाला की तेवढेच प्रत्येकाचे डोळे उघडत आणि पुन्हा अंधार.

सुर्य उगवायला आणि एस. टी. त्या गावात पोहचायला एकच वेळ. गावातले काही चळवळे आगोदरच आमची वाट पाहत उभे. मग त्यांच्यासोबत आम्ही विखुरलो गेलो आणि आंघोळ वगैरे करून पुन्हा घटना घडलेल्या ठिकाणी वेळेवर हजर. काही जण गाड्यांमध्ये काही चालत. मी पोहोचल्यावर आगोदरच गर्दी. एका झाडाखाली आम्ही आंदोलनकर्ते शांतपणे बसलेलो. हातात नेहमीप्रमाणे फलक.  घटना घडली त्या गावात एक पोलीस चौकी होती आणि पोलीस चौकीसमोरच आम्ही. पोलीस चौकी असूनही गुन्हा कसा काय घडू शकतो? बरेच न्यूज चॅनलवाले आलेले न्यूज कव्हर करायला.

मलाही, "काय वाटतय? " असं विचारलं एकाने , समोर कॅमेरा असूनही मला बोलताच आलं नाही. मी फक्त , "हे सगळं थांबायला हवं. " इतकंच म्हणालो,

तर तोही "कट" म्हणून निघून गेला. दुपारी पोलीसांच्या चार भल्या मोठ्या गाड्या. माणसं पकडून नेण्यासाठी आलेल्या. कोंबलं आम्हाला आणि घेऊन निघाले. न्यूज चॅनलवाले बिचारे सगळं काही निमुटपणे शुट करत कॅमेऱ्यासमोर मनाला येईल ते बडबडत होते.

तीन तास पोलीसांची गाडी फिरत होती तर मला वाटलं आम्हाला डांबून ठेवण्यासाठीचे तुरुंग इतके लांब कसे ? मग गाडी एका ठिकाणी थांबली आणि आम्हाला सगळ्यांना उतरायला सांगितलं, उतरलो तर गाडी चक्क धूर सोडत निघून गेली.

आमच्यातला एक वयस्कर म्हणाला, "हे साले आंदोलनातली हवा काढण्यासाठी आंदोलनाच्या ठिकाणहून लांब कुठेतरी सोडतात बऱ्याच वेळेला आणि मग निघून जातात. "

मी विचारलं, "आता काय? "

तर तो म्हणाला, "परत जायचं. "

आणि निघालो परत. माणसाने न्याय मागतानाही इतकं लाचार व्हावं? . . . . . . . . . . . . . . . . . पण हि लाचारी कुठे होती. . . . . . . . म्हणजे न्याय मागतानाही इतकी दमछाक व्हावी हे भयानक. आपण आणि आपला देश एका

भयानकतेच्या महाद्वारावर ऊभे आहोत. टिव्हीवर जितकं दाखवलं जातं तितका काही सुखी नाहीये आपला देश. आपण निव्वळ देखावे करण्यात हुशार आहोत. हा पहा ताजमहल, संगमरवराने बांधलेला. हा लाल किल्ला, हे गेट वे ऑफ इंडीया, हे भव्य स्मारक, हे उजेडाचे चमतमते दिवे. नुसते देखावे करून करून आपण देखाव्यांचा देश झालो आहोत. चमचमत्या उजेडाची सवयच झालीये सगळ्यांना.

उद्या पुन्हा आंदोलन करायचं होतच, आम्ही डाळ भात खाऊन शांत झोपी गेलो आंदोलनाच्याच ठिकाणी.

*****

लख्ख उजेड. एका भल्या मोठ्या नदीच्या काठावर होतो आम्ही. उघडे. पुरूष काय आणि स्त्रिया काय, सगळेच उघडे. अंगावर एकही कापड नाही. आमची सगळी कापडं नदीच्या पलीकडच्या तिरावर. काही पांढरीशुभ्र माणसं चिता रचत होती. आणि चिता रचून झाल्यावर मग आमची कापडं त्यावर ठेवली आणि दिला अग्नी. बघता - बघता आमच्या कापडांची आग झाली आणि नंतर लगेच राख. मग ती राख समोरच्या नदीत विसर्जीत केली गेली. आम्ही सगळेच डोळे टवकारून नागड्या डोळ्यांनी सगळं बघतोय. तर नंतर लक्षात आलं कि समोरची माणसही आमच्यासारखीच नागडी होती. पण शरीरावर पांढरी राख. प्रचंड पांढरी माणसं होती कि कुठलाही डाग पटकन दिसावा त्यांच्या अंगावर. ते आमच्या अस्थी विसर्जीत करतच होते. मग ते निघाले आम्हाला पाठमोरे होऊन तर त्यांच्या पाठीवर एक भला मोठा काळा सुर्य दिसत होता. सुर्य इतका काळा होता कि ओळखुच येत नव्हता. पण आमच्या नागड्या डोळ्यांनी पटकन ओळखता आला. कुणीतरी आमच्यातलंच म्हणालं " हे किती दिवस सुर्य लपवून ठेवणार आहेत? "

तर ते पांढरीशुभ्र माणसं मागे बघून मोठ्याने हसु लागली, एवढ्या मोठमोठ्याने कि त्यांच्या रक्ताळलेल्या दातांना ते लपवुच शकत नव्हते. मोठमोठ्याने हसत हसत ते खाली वाकले आणि दगड उचलून आमच्याकडे भिरकावू लागले.

*****

सकाळी जाग आली तशी वस्तीतच कुणाकुणाच्या घरी तोंड वगैरे धुवून चहा वगैरे घेतला आणि पुन्हा आंदोलनाच्या ठिकाणी. तर या जिल्ह्याचे पालकमंत्री सकाळी सकाळी हजर. ह्यांच्या चेहऱ्यावर सदैव चिटकवलेलं हसु. हात जोडूनच सर्वांसमोर हसत उभे. माणसं मारली जातात आणि राजकारण्यांच्या चेहऱ्यावर हसु कसं काय उमटू शकतं?

ते हसतच " मी पोलीसांना सज्जड दम दिलाय, आपलं राज्य या असल्या घटना बिलकुल खपवून घेणार नाही. एकेकाला चाबकाने फोडलं पाहिजे. माझ्या बांधवांवर होणारा अन्याय मी सहन करणार नाही. मला फारच वाईट वाटतय. ( आणि तरीही बिचाऱ्याच्या चेहऱ्यावरचं हसणं अधूनमधून डोकावत होतं. ) या प्रकरणाच्या तळाशी जाऊन तळागाळातल्या लोकांचे प्रश्न आम्ही मिटवून टाकु. तुम्ही हे आंदोलन मागे घ्या, पोलीस मुळापर्यंत जातील याचं आश्वासन मी देतो. राज्यभरातून तुम्ही या प्रश्नावर झगडायला इथे आलात म्हणजे आपलं राज्य अजुनही जागं आहे आणि डोळे उघडे आणि मन कणखर आहे. "



तो पांढराशुभ्र सदरा गुळमुळीत बोलून निघून गेल्यावर आमच्याच चळवळीतल्या वरिष्ठांची चर्चा सुरु झाली. दुपारनंतर मग कळलं कि महत्वाची माणसं प्रकरण तडीस लावण्यासाठी इथे थांबतील आणि बाकीचे सगळे आपापल्या घरी.

*****

सकाळी घरी आलो ते डायरेक्ट झोपीच गेलो. एस. टी. तून येताना फारच दगदग झाली. आणि आठ तासांचा प्रवास. त्यात निम्म्यापेक्षा जास्त माणसं आंदोलनातली त्यामुळे एकटं बिलकुल वाटलं नाही. घरी आल्यावर सगळं शरीर सुटं सुटं झालंय की काय असंच वाटत होतं. झोप पटकन आली.

*****

झोपेतून उठलो तर बाप समोरच खुर्चीवरच मांडी घालून बसलेला.
म्हणाला, "आपल्यातलीच माणसं मारलीयेत. पण तुला कशाला हवय नाक खुपसायला. टीवी वर तुला पोलिसांच्या गाडीत कोंबताना दाखवत होते सारखं, तर तुझी आई जेवली नाही कालपासून. आपण आता शहरातले झालोत, माणसात वागायला शिक तर तेही नाही. तू आपला इकडे फिर तिकडे फिर, तू नसते उद्योग करून वीट आणलायस मला. कुळ बुडवतोयस तू कुळ. "

आणि निघून गेले.

मी आपला सारखं सारखं कुळ बुडवाता येतो का या विचारात.

तर आई सांगू लागली, "कालपासून दिवसभर कोण ना कोण येऊन विचारत होतं म्हणून रागावलेत. " असं म्हणाली आणि निघून गेली काम करायला.

घड्याळात दहा वाजलेले तर मी आंघोळ करून आमच्या चळवळीतल्या एका मुलाच्या घरी जावु लागलो तर आईने खायला दिलेलं निमुटपणे खाल्लं आणि निघालो मुलाच्या घरी.

*****

हा मुलगा फारच भन्नाट मिश्रण होता. चळवळ फीळवळ बिलकुल न मानता माणूस या प्राण्यासाठी झटायला हवं असं त्याला वाटत होतं. माणूस पूर्वी प्राणी होता आणि माणूस होऊन प्राणी होण्याची त्याची प्रक्रिया फारच लवकर सुरु झाली असं तो म्हणायचा. सत्ता, संपत्ती याचा हव्यास माणसाला पुन्हा प्राणी बनवायला कारणीभूत ठरलं वगैरे वगैरे. म्हणून ह्याने कळत्या वयात घर सोडलं आणि आठ वर्षे भयंकर काबडकष्ट करून पैसे जमवले आणि तीन लाखात झोपडपट्टीत घर घेतलं. एकटाच असतो. हा बिव देव सगळं खोटं मानायचा आणि तो "बिव जर असता आणि त्याने जर स्त्री - पुरुष निर्माण केले असते तर मग एकतर त्याने स्त्रियाच तयार केल्या असत्या आणि किंवा पुरुषच तयार केले असते. भांडण लावायला दोघांना तयार केलं काय त्याने? प्रजनन वगैरेची सोय झालीच असती कि रे आणि नसतोच जन्माला आपण माणूस प्राणी तरी ह्या पृथ्वीचं काहीच बिघडलं वगैरे नसतं रे. "

हे असलं आभाळभर बोलायचा एकदम आणि कधी मधी एकदम गप्प व्हायचा आणि एकदम शांतपणे कुठेतरी बघत बसायचा गप्पपणे. आणि हा सांगायचा कि चळवळ बिळवळ न मानता त्या चळवळीतल्या माणसांच्या माणुसकीला मानायला हवं आणि "माणूस म्हणून कुणाच्या मदतीला धावून जाणं किती छान आहे ना, " असं समजवायचा. आणि म्हणून तो सोबत असताना भन्नाट असायचं नेहमी.

तर आज मी त्याच्या सोबतीला गेलो तर हा घरात पालथा पडून काहीतरी लिहित होता तर मी सुलथा पडलो त्याच्या बाजूला आणि मगच विचारलं कि, "काय लिहितोयस? "

तर तो आपला काहीच न बोलता लिहिताच होता शांत. मी तासभर त्याच्या छपारकड़े टक लावून बघत राहिलो. ह्याने मोरीच्या इकडे छताला एक भोक पाडलय आणि ते भोक तो पावसाळा संपला कि बंद करून ठेवतो आणि पाऊस आला कि उघडतो आणि बरोबर ड्रमाच्या वर भोक असल्याने पावसाळ्यात हेच पाणी वापरतो हा. प्यायला भरतो नळातलं पाणी पण आंघोळ, कपडे, भांडी ही कामं ड्रमातल्या पाण्याने.

एका तासाने हा पठ्या लिहिलेली सगळी सगळी पानं फाडून फेकून देवू लागला तर मी त्याच्याकडे आणि फाटलेल्या पानांकडे नुसता बघतच बसलो आणि मग त्याला म्हंटलं कि अरे वाचायला तर द्यायचास ना तर हा म्हणतो , वाचाण्यासारखं नव्हतं काही त्यात, मग उठला आणि एका डब्यावर बसला. फारच गडबड वाटत होता आज.

म्हणाला, " तुला कळलं का नाही, सात जण होते त्याला मारायला आणि सातीच्या साती फरार. पोलिस सांगतायत कि सापडतच नाहियेत आणि नुसते आरोपच आहेत की त्यांच्यावर आणि ते सिद्ध कुठे झालेत अजुन आणि ते गुन्हेगार नाहियेत, आरोपी आहेत. हे पण पोलिसच सांगतायत नेहमीप्रमाणे. पण तिघे जण तर नातेवाईक आहेत राजकारण्यांचे त्यातले, म्हणून ही टाळाटाळ. "

मग नुसताच हा अस्वस्थ होवून थरथरु लागला. त्याच्या डोळ्यातून पाणी येवू लागलं मग.

मग म्हणाला, "चल कुठेतरी जाऊन चहा पिऊया, जेवलो पण नाही दुपारी. "

तर तेव्हा माझ्या लक्षात आलं की दुपारचे चार वाजलेत आणि ते आपल्या लक्षातच आलं नाही.

*****

चहाच्या टपरीवर चहावाला स्वतःच बनवलेला चहा स्वतःच पित होता. दुसऱ्या हातात बीडी आणि कानाला दुसरी बीडी. आम्हाला बघून उठला आणि बैठो सेठ म्हणाला तसा मी अगदी एखादा सेठ बसेल तसा पाय वर करून बसलो खुर्चीला मागे रेलून तर कोसळलोच जमिनीवर पटकन. मग मित्र आणि चहावाला झटक्यात मला हात द्यायला पुढे. उठलो तेव्हा हाताला खरचटल्याच कळलं. चहा प्यायलो नंतर चहावाल्याने दिलेला,
तर मित्र म्हणाला, "दारुच प्यायला हवी आज तिच्यामारी, शरीरात रक्ताऐवजी अल्कोहोल धावायला पाहिजे, मग सगळेच माणुसकीच्या नशेत फिरतील माणसासारखे. नाहीतर रक्त ह्याचं वेगळं आणि त्याचं वेगळं म्हणून भांडत बसायला भयानक का वाटत नाही ह्यांना? हॉस्पिटलमध्ये गरज लागते तेव्हा ही कुणाच्या रक्ताची बाटली आहे असं विचारतो का आपण? मग समजा ज्याने आपल्याला गरज असताना रक्त दिलं आपल्याला माहित नसतानाही तर मग धर्मावरून जातिवरून भांडण करताना आपण त्या रक्त देणाऱ्यालाच कशावरून मारत नसावं, म्हणून मग रक्ताची नशा फारच भयानक. दारुच्या नशेपेक्षा.

नाही पण साला दारू पिणारेही मग स्वतःच्या जाती, स्वतःचे धर्म बांधत सुटतील. च्यायला बातम्या झळकतील आत्ताच्यासारख्या, " बीयर धर्मातल्या एका इसमाने बॅगपाइपर धर्मातल्या एका मुलाला भोसकून मारलं तर त्याचा निषेध छोट्याश्याच असणाऱ्या देशी धर्माने केला". च्यायला हे तर फारच भयानक झालं असतं. एकूणच काय तर कुठलीही एकूण नशा ही फारच भयकल्लोळ असते. अल्कोहोलची काय किंवा धर्माची काय!"
मग त्याने स्वतःची संपत आलेली सिगारेट पायाखाली टाकून चिरडून चहावाल्याला पैसे दिल्यावर मग आम्ही निघालो.

*****

मी घरी आल्यावर टी. वी. वर मित्राने सांगितलेली बातमी बाप बघत बसला होता तर बापाने माझ्याकडे फारच तुसड्या नजरेने बघितलं आणि टी. वी. चा चॅनेल बदलून " तेरा प्यार प्यार प्यार हुक्का बार" बघु लागले. आई भिंतीला टेकून बसली होती मान वर करून कुठेतरी बघत. मी कपडे वगैरे काढून हाफ पँट घालून थोडासा मोकळा झालो तर मग आईकडे पहिल्यावर कळलं कि आईच्या डोळ्यात पाणी म्हणून मी घाबरलो.

मी बापाला सांगितलं कि आई रडतेय तर बाप म्हणाला, " तू, तुझी आई, तिचं घराणं एके दिवशी मला विकून खाल. "तर हे तर अजबच आहे. मी म्हणालो , " एक तर विकू तुम्हाला पण तुम्हाला कुणीच विकत घेणार नाही आणि खाऊ असं म्हंटलं तरी मनुष्य-मांसाहारी आम्ही अजून तरी नाही. "

आणि मी हे असं म्हंटलं तर बापाने डोळे वाकडे तिकडे करत मोठे करण्याचा प्रयत्न करत माझ्या थोबाडीत उमटवली. आणि घरातून झटक्यात निघून गेले.

हे बरंय, बापाला झाला आईचा त्रास कि बाप गेला घरातून निघून बाहेर, मला झाला आईचा त्रास तर मी गेलो घरातून बाहेर आणि आम्ही आपले बाहेर जाऊन सगळ्यांशी गप्पा मारत हसत बसतो तर आई बिचारी रडत बसते. आई फारच बिचारी होऊन मुसमुसून रडु लागली तर मी तिला शांत करू लागलो. आई थोड्याच वेळात स्थिर झाली आणि मग सांगितलं कि " तुझ्या मामाची मुलगी पळून गेली दुसऱ्याबरोबर आणि लग्न सुद्धा केलं आणि म्हणून तुला, मला, माझ्या घराण्याला नावं ठेवत होते. "

मी मनातल्या मनात खुश कि माझ्या लग्नाचा डाव तरी धुळीस मिळाला. आई गुपचुप उठून तोंड धुऊ लागली. मी मनातल्या मनात च्यायला म्हणजे तिच्याही मनाविरुद्ध हा सगळा लग्नप्रकार घडवू पहात होते काय? मी मामाच्या मुलीला गरज पडल्यास मदत करायचं असं मनात ठरवलं.

पण आई येऊन माझ्या डोक्यावर हात फिरवून " तुझ्या नशिबातच नव्हतं रे राजा, तिच्याशी लग्न, " म्हणाली आणि स्वयंपाक करू लागली. आम्ही दोघेही म्हणजे मी आणि बाप कधी ना कधी रागावतो तिच्यावर म्हणजे आईवर, पण ही नेहमीच दोघांसाठी म्हणजे माझ्यासाठी आणि बापासाठी जेवण करते आणि आत्ताही करत होती तर मला तिच्या शरिराकडे पाहून फारच करुण वाटलं मला. घरासाठी राब राब राबते आणि शेवटी तरिही स्त्रियांना सर्टिफिकेट मिळतच नाही ना काही?

मी आईला येतो म्हणून बाहेर पडलो.

*****

एका पडेल नेत्याच्या वाढदिवसानिमित्त ठिकठिकाणी बॅनर लावले होते. शहरात वारा यायला जागाच ठेवत नाहीत कोण. आभाळाला लपवायचे भरमसाठ प्रयत्न सगळ्याच सगळ्यांचे. शहराच्या बाहेर लांब कुठेतरी आपल्याच जवळच्या गावात खालचे विरुद्ध वरचे असे वर्षानुवर्षे चालणारे वाद विकोपाला जाऊन खालच्या जातीतल्यांना जाळलं जातं, मारलं जातं, कापलं जातं आणि शहरात शुभेच्छांचे बॅनर आणि पाणीपुरी आणि फेसाळणारी बीयर आणि सिगारेटचे पांढरेशुभ्र धुर आणि क्रिकेटच्या नावावर भयानक खर्च आणि चौपाटीवर मिठीत पडलेली शरीरं आणि वर्षानुवर्षे एकाच थिएटरला दिलवाले दुल्हनिया ले जायेंगे आणि आपलं नाक अभिमानानं किती भरुभरून श्वास घेत राहतं उगाच.

*****

दुकानातून एक काळा फ्रॉक घातलेली बाहुली घेतली विकत तर दुकानदाराला तीनशे रुपये द्यावे लागले. दुकानदाराने हसतच २९९ म्हणून १ रूपया परत दिला तर तो एक रूपया बाहेरच एका भिकाऱ्याला त्याने मागितल्यावर दिला.

मी आपला स्वतःचा स्वतःच चालतच होतो एकटा. आजुबाजूने गाड्यांचे हॉर्न धावत होते वेगाने. बाहुलीशी अजुन ओळख पण झाली नव्हती तर तिच्याशीही काय बोलणार.

तोवर अंगावर बनियन आणि फाटकी चड्डी असलेला एक माणुस धावताना दिसला आणि त्याच्या पाठोपाठ बरेच जण धावत ' पकडो, पकडा" करत धावत होते आणि मीपण पाठोपाठ धावलो तर सगळेच त्याला धरून बडवत होते. मी मध्येच पडून मग त्याला थोडं वेगळं काढलं, बिचऱ्याच्या नाकातून रक्त येत होतं आणि कपाळ पण फुटलं होतं तर एक हॉटेलवाला समोर येऊन, " मारो सालेको. मेरे हॉटेलसे गुलाबजाम चुराके भागा. " आणि मार खाणाऱ्याच्या हातात एक गुलाबजाम पारच चेन्दामेंदा झालेला. सगळेच चेहरे त्याच्याकडे रागाने बघत होते तर मी गुलाबजामचे पैसे विचारून त्याला दहाची नोट दिली आणि मार खाणाऱ्याला दोन वडापाव दिले खायला आणि निघालो घरी.

*****

घरी आलो तर आईबाप शांतपणे हसत होते, म्हणजे आई हसत होती तर बाप काहीतरी बडबडत होता. आई पुन्हा तोंडाला पदर लावून हसत होती. बाप जेवत होता आणि आई वाढत होती.

एक ताट समोर ठेवून म्हणाली, "बाळा तू पण जेव. "

मी बसलो जेवायला तर बाप, "काय मग शेठ कसे आहात? " म्हणू लागला.

कसे आहात? हा माझा बाप इतका मोकळा कसा झाला कुणास ठावुक. तर बापाने पुन्हा प्रश्न करून मला चक्क डोळा मारला आणि मी जागच्या जागी एक फूटभर उडालोच.

तर मी बापाला म्हणालो कि, "आहे कसा बसा अजुन. "

पण बाप हसतच म्हणाला कि, "काळजी करू नकोस, तुझ्या मामाच्या लहान मुलीने तुझ्याशी लग्न करायला होकार दिलाय. ती म्हणाली ताईने केलं ते वाईटच. " आणि मोठ्याने हसले.

च्यामारी तिने वाईट केलं यात हसण्यासारखं काय? तसा मी पटकन खवळलो आणि तोंडातला घास चावून संपवला तर हातातला रागाने ताटात टाकला आणि सांगून टाकलं कि, " तुम्ही माणसं नाही शैतान आहात, सतत मान अपमानाच्या ओझ्याखाली घामेजलेले माकड आहात तुम्ही, तुम्हाला लाज नावाची वस्तुच नाहीये, तुम्ही कधी कुठला घाणेरडा विचार कराल हे तुम्हाला सुद्धा कळत नाही, "

तर बाप भयानक थरथरू लागला, "तुला जन्म दिला हिच माझी सर्वात मोठी चुक. " म्हणाला

तर मीपण आवाज न चढवता, "माझ्या ३१ वर्षानंतर तुम्हाला चुक उमगली हे तर फारच उशीर केलात तुम्ही. " म्हणालो. तसा बाप आईला तिच्या आईवरून दोन शिव्या घालून जेवाणावरून उठला आणि मी मात्र जेवतच राहिलो.

बाप जमिनीवरच हातपाय पसरून झोपी गेल्यावर आईने त्याला पांघरून घातलं तर पुन्हा एक शिवी. मी शांतपणे घराच्या ओट्यावर आलो. बाहुली होतीच सोबत. तिला नुसताच छातीशी कवटाळून बसलो. १५ मिनिटांनी आई आणि शांत झोप तरी घरात म्हणाली. मग मी घरात जाऊन झोपी गेलो शांत.

*****

जाग आली तेव्हा चक्क रात्रीचे बाराच वाजलेले आणि बाहुली कोपऱ्यात बसून एकटक माझ्याकडे बघत होती तर माझ्या लक्षात आलं कि अरेच्या आपण हिच्याशी बोललोच नाही, आपण म्हणजे मी स्वतः एकटाच इतका वाईट कधी झालो? तिला जवळ घेतलं आणि सॉरी म्हणालो तिला.
म्हणालो, " तुझा भाऊ आहे ना मी, मग मला माफ कर. " तसं तिने पटकन माफ केलं हसून. मी तिला दुकानातून आणल्यापासून एकदाही हसणं मावळलं नाही बिचारीचं.
तिला म्हणालो, "बापाशी फारच दानवी बोललो ना मी, अगं मामाची लहान मुलगी अठरा वर्षाची तर मी एकतीस वर्षाचा. आता जवळ जवळ दुप्पट वय आमचं, म्हणजे माझं तर मग मी कसं लग्न करणार तिच्याशी. "
पण नंतर लक्षात आलं कि बाहुलीला पण झोप आली असणार तर तिला पांघरुण घालून मीपण झोपी गेलो.

*****

सकाळी चार वाजता गाडीवर कांदेपोहे विकताना समोरच्याच फुटपाथवर एक माणुस चेहरा जमिनीकडे करून झोपला होता, रात्री खुपच झाली असावी त्याला.  माणसं येत होती आणि कांदेपोहे शिरा खाऊन आपापल्या कामावर निघून जात होती. सहा वाजता कांदेपोहे आणि शिरा संपल्यावर आम्ही निघायच्या तयारीत तर समोरच्या फुटपाथवरचा माणुस अजुनही तोंड जमिनीकडेच करून. मी त्याच्याजवळ जाऊन त्याला सरळ केला तर हा तोच बारमधला निघाला. मला रात्रभर सोबत घेवून काहीतरी बरळणारा. तोंडातून रक्त आणि संपुर्ण तोंड रक्ताने माखलेलं. श्वासोच्छवास पुर्णपणे बंद. मला भेटतो उद्या म्हणालेला आणि न भेटताच निघून गेला. मी फारच संपून गेलोय कि काय असं झालं. माझ्यासोबतचा मुलगा आला रिकामे डबे हलवत तर मी त्याच्या डोक्याजवळ फुटपाथवर बसलेलो. नंतर पोलिसांना बोलावलं तर पोलिस शांतपणे त्याचे खिसे वगैरे चेक करून त्याची ओळख पटतेय का ते पाहु लागले. त्याच्या खिशात मतदानपत्र. त्यावर नाव ओळखीचं वाटलं मला. इतका ओळखीचा झाला होता का तो?

त्याच्या खिशात मोबइल होता तर तोपण लॉक करून ठेवलेला.

पोलिस म्हणाले, "करतो काय ते आम्ही. तू जा. " तर मला पहिल्यांदा वाटलं कि माझ्याकडेही मोबाइल हवा होता. मी पोलिसांना नंबर देऊन मग चौकशी केली असती की.

पण पोलिसाचा नंबर घेतला मी, तर त्यानेही पटकन दिला आणि म्हणाला, " काळजी करू नका. "

*****



मग आम्ही निघालो तिकडून तर सोबतचा मुलगा अगदीच शांत. आणि अचानक फुटपाथवर बसून रडू लागला. आजुबाजुने भयंकर गर्दी धावत होती स्टेशनकडे आणि हा त्या गर्दीत रडतोय. मी त्याला एका टपरीजवळ नेलं आणि तिथं एका बाकडयावर बसवून त्याला चहा दिला तर हा तरीही रडतच होता. मग म्हणाला, " माझा बाप पण फुटपाथवरच मेला. दारू बीरू बिलकुल पित नव्हता आणि नेहमी आनंदात असायचा आणि आई सांगयाची घरात तांदुळ नाहीत तर मग हसायचा आणि बाहेर जाऊन कुठुनतरी तांदुळ घेवून यायचा. आम्हाला उपाशी राहु दिलं नाहीच कधी. नाईटला वॉचमन होता तो. एक दिवस गेला तो हसतच आणि सकाळी त्याच बिल्डिंगच्या गेटसमोर फुटपाथवर मेला तो. कुणी मारलं कुणास ठाऊक? फक्त त्या दिवशी बापाचा चेहरा फारच भयाण झाला होता. वर्ष झालं. तपास चालु आहे. "

मी ह्या मुलाला पहिल्यांदाच एका दमात इतकं बोलताना पाहिलं. ह्याची पण एक काहीतरी वेगळी गोष्टं असावी असं मला कधीच वाटलं नव्हतं. तर मी चहाचे पैसे दिले आणि निघालो रिकामे डबे घेऊन. मग वाटेत मी विचारलं त्याला कि, "घरी आई आणि तू असे दोघेच असता काय? " तर तो म्हणाला, " मी, आई आणि बाप असे तिघे असतो. आई गरोदर आहे आता."

मी तर भन्नाट चक्रावलो. ह्याचा मेलेला बाप पुन्हा ह्याच्याच घरात? बिचाऱ्याच्या डोक्यावर परिणाम झालाय कि काय? मी म्हणालो, " मला कळलं नाही. " तर म्हणाला कि, " बाप गेल्यावर आईने दुसरं लग्न केलं. "

तर माझ्या तर हे लक्षातच आलं नव्हतं. बाई विधवा झाली कि आयुष्यभर कोरं कपाळ घेवून फिरते एवढंच मला माहित तर ही गोष्ट तर भलतीच सुंदर निघाली. बाईच्या मनातून पुरूष कधी विचारच करत नाही आणि मी पण त्यातलाच हे जरा भयानक. पण त्याच्या आईने लग्न केलं हे ठीकच होतं की. नाहीतरी बायको गेल्यावर बायकोच्या तेराव्याला स्वतःच्या लग्नाचे विचार करणारे पुरुष असतातच की, मग बाईने असा विचार केला तर बिघडलं कुठे?

*****

घरी आलो ते झोप घेऊनच, तर आई, " बाळा काहीतरी खा" म्हणाली तर मी झोप आलीये खुप म्हणल्यावर म्हणाली, " झोप शांत. "

बाप तिकडे स्टुलावर टांग टाकून खुर्चीवर बसला होता बातम्या बघत. टीवी वर न्यूज सुरु होत्या, पुन्हा कुणाचातरी कुणावर तरी बलात्कार झाला होता. नऊ वर्षाची मुलगी, स्थळ दिल्ली आणि बाप हे सगळं चहा पित खुर्चीवर बसून बघतोय हे मात्र भयानक. आणि मी मात्र फार मोठी झोप आल्यागत पटकन झोपी गेलो.

*****



साला माझं लग्न कधी, कुणी आणि कसं ठरवलं तेच मला कळत नव्हतं. आंतरपटापालिकडे खुपच छोटी अशी एक मुलगी होती. बापकडे पाहिल्यावर बाप म्हणाला, " मामाची दुसरी मुलगी पण पळून गेली, ही तिसरी मुलगी. वय वर्षे दहा. " तर मामाला तीन मुली होत्या हेच मला माहित नव्हतं. माझे दोन्ही दंड साखाळीने बांधून त्याचा लगाम बापाच्या हातात आणि बापाने चक्क पुन्हा एकदा डोळा मारला आणि मग झालंच ना माझं लग्न. मग देवदर्शन पण झालं पटकन आणि आई-बाप गावी निघाले आम्हाला मुंबईत सोडुन.

राञ जवळ आल्यावर मी त्या दहा वर्षाच्या मुलीजवळ म्हणजे माझ्या झालेल्या बायकोजवळ गेलो तर तिच्या चेहऱ्यावर ओरबाडल्याच्या असंख्य खुणा. कोपऱ्यात माझ्या बाहुलीतली बहिण माझ्याकडे न हसताच बघत होती. मग हळूहळू ह्या दहा वर्ष्याच्या मुलीचे स्त्रीत्वाचे सगळे दागिने गळुन पडु लागले. केस, ओठ, नाक, स्तन, बेंबी, योनी, सगळं गळुन जमिनीवर खाली फक्त काळीकुटट राख राहिली होती. मी बाहुलीकडे पाहिलं तर तिथेही राख राहिली होती. नुसतीच राख.



*****

दचकून जागा झालो तर संपुर्ण ओलाच झालो होतो मी. उशाशी आई बसली होती आणि मला सांगत होती कि, " फारच जोराने श्वास घेऊ लागलास तू आणि दरदरून घाम सुटला तुला मला तर काहीच कळेना तर तुझे बाबा निघूनच गेले तडक शिव्या हासडून. "
 मी कोपऱ्यात पाहिलं तर बाहुली अजुन जिवंत होती तर माझा श्वास सुरळीत झाला. म्हंटलं आईशिवाय कुणीतरी जिवंत आहे इथे मनातल्या मनात. तर आईने गोमुत्र वगैरे शिंपडुन मला स्वच्छ करण्याचा प्रयत्न केला आणि मग उठून आंघोळ करून अजुन स्वच्छ झालो मी. खाल्लं काहीतरी आणि मग तसाच बाहेर पडलो.

बाहेर पडल्यावर भरपुर उन्हात फिरून घेतलं दोन तास. मग चौपाटीवर गेलो तर बरीच पुरुष शरीरं स्त्रीशरीरांना चिटकलेली होती. च्यायला गुरुत्वाकर्षण आणि स्त्रीत्वाकर्षण दोन्हीही ग्रेटच म्हणा पण बाहेर नऊ नऊ वर्षाच्या मुलींवर बलात्कार होतात आणि इथे चौपाटीवर स्त्रिया पुरुषांच्या ओठाला ओठ लावून गप्पा कशा काय मारू शकतात?

*****

शहरात ठिकठिकाणी झालेल्या हत्याकांडाविषयी निषेधाचे बॅनर लावले होते. दोन दिवसांनी मंत्रालायवर मोर्चा काढायचं ठरलं होतं तेही बॅनरवर नमुद.

फुटपाथवरून काही श्रीमंत कुत्रे त्यांच्या मालकांना घेवून फिरत होते. गळ्यात पट्टे अडकवून ह्या कुत्र्यांना कसं काय फिरता येत असेल मोकळं . फुटपाथच्या बाजूच्याच रस्त्यावरून काही भटकी कुत्री गाड्या चुकवत इकडे तिकडे फिरत होती. श्रीमंत कुत्री पट्ट्यासकट मानेतल्या मानेत गर्व साजरा करत असावी असं वाटत होतं तसा एक श्रीमंत कुत्रा पटकन भुंकलाच भटक्यांवर सरळ, तर भटाक्यांचा ताफाच त्या कुत्र्यावर भुंकु लागला, तसे श्रीमंत कुत्र्यांचे तीन चार मालक एकत्र येऊन भटक्यांना काठीने सडकु लागले. पळून गेले बिचारे आणि श्रीमंत कुत्रे पुन्हा रुबाबात चालु लागले.

*****



चळवळीतल्या लोकांना भेटलो संध्याकाळी तर ते खुपच चेहरा पाडून होते. गेलेल्या मुलापेक्षाही भयानक त्रास सगळ्यांच्या चेहऱ्यावर आणि तो असायला तर हवाच. सगळेच उदास होऊन होते. चळवळीतला अनुभवी आणि वयस्क चेहरा आला तसा सगळ्यं नाच सांगु लागला कि, "दोन दिवसांनी होणाऱ्या मंत्रालयावरील मोर्चात विद्यार्थी मोठ्या संख्येने आले पाहिजेत. आपण जितक्या लोकांपर्यंत पोहोचता येईल तितकं पोहचुया आणि शांतपणे मोर्चा काढुया. " आणि मग बराच वेळ सगळं काय आणि कसं करायचं हे ठरत होतं. प्रत्येकाच्या उदास माना होय अशा डोलत होत्या आणि नंतर सगळेच निघालो पटकन घरी.

*****

घरी पोहचलो तर घराला कुलुप तर मग मी वैतागलोच. दिवसभर फिरून फिरून थकलोय आणि घराला कुलुप? आई कुठेतरी गेली असेल, येईल थोड्या वेळात असा विचार करून अर्धा तास फिरुया कुठेतरी असा विचार केला तर शेजारच्या मुलीने हाकच मारली थेट आणि मग किल्ली दिली हातात आणि किल्लीसोबत माझा मोठा चुलता वारल्याची बातमी तर मला लगेच भरून आलं आणि कुलुप उघडून घरात येऊन शांत बसलो थोडा वेळ. बाहुली हसतच होती. तसं मग मी तिला म्हणालो कि, "अगं वेडे आपले मोठे चुलते वारले, ज्यांचे दोन्ही पाय गेल्या वर्षी गेले ना अपघातात. ते चुलते आज सोडून गेले सगळ्यांना. पण त्यांना मुलगा काही झालाच नाही शेवटपर्यंत. बारा मुली त्यांना. रक्षाबंधनला गावी गेलो की हात खांद्यापर्यंत भरून जायचा माझा. त्यातल्या तिघींनी एकाच वेळी आत्महत्या केली विहीरीत उडी टाकून. तेव्हापासून गेलोच नाही रक्षाबंधनला. हात रिकामा राहील की काय याची भीती वाटत होती. तिघींची गेल्याच वर्षी एकाच मांडवात लग्न उरकली. सहा बाकी. त्या ज्या आत्महत्या केलेल्या तिघी ना दिसायला फारच कुरूप, लग्नच जमत नव्हती त्यांची, केली आत्महत्या. साला लग्न इतकं महत्वाचं असतं का? कि ते पटकन झालंच नाही तर मरावचं लागतं पटकन. शरीराची भूक असतेच म्हणा.

लग्न न जमण्याच्या जाणिवेपेक्षा शरीराची भूकच आत्महत्येला प्रवृत्त करत असावी कदाचित. पण तू घाबरू नकोस, मी लग्न नाही करणार. " मी बाहुलीशी बराच वेळ बोलत होतो.

तोवर शेजारची मुलगी जेवण घेऊन आली आत तेव्हा लक्षात आलं की दार लावलंच नव्हतं मी घट्ट.

ही शेजारची मुलगी आहे ना, एकटीच राहते. दिवसा कामाला जाते आणि संध्याकाळी योगा वगैरे करते आणि मग घरी येऊन स्वतःच जेवण बनवते आणि स्वतःच खाते, आज माझ्यासाठी आणलं. मी दार घट्ट लावून मगच जेवु लागलो.

ह्या मुलीच्या बाबतीत भयानक काहीतरी घडलं असणार जे हिने आजपर्यंत कुणालाच सांगितलं नाही. पण ही सतत हसत असते. चेहऱ्यावरची हसणारी ठेवण कधीच बिघडत नाही हिच्या. तशी फार डेंजर आहे, एक मुलगा मागे लागलेला हिच्या तीन दिवस तर चौथ्या दिवशी त्याच्या लिंगावरच लाथ मारली हिने आणि भर रस्त्यावर त्याच्या छातीवर बसून मग दम दिला भरमसाठ. हिला शरीराची भूक नसावी, कारण ही त्यासाठी काहीतरी आध्यात्मिक करते आणि सोबत योगापण करते.

टि. वी. चालु केला तर टि. वी. वर दोघेजण एका सिनेमात बसून दारू पित काहीतरी बडबडत होते तर मला त्या बारमधल्याची आठवण आली. त्या पोलिसाचा नंबर तर होता पण त्याला कॉल करण्यासाठी मोबाइलच नव्हता. एक मोबाइल बापासोबत गावी गेला असावा.

चॅनेल बदलत सुटलो भरभर. एक हिरो तीस चाळीस जणांना ठोक ठोक ठोकत होता. मी शाळेत असताना फारच कौतुक वाटायचं सगळ्यांचं. आता नाही. एक हिरोईन कपडे काढून आतल्या कपडयातच हिरोपुढे गाणं म्हणत होती आणि हिरो वैतागलेला. चॅनेल बदलत बदलत बातम्यांवर गेलो तर दिवसभरातल्या बातम्या सुपरफास्ट पद्धतीने धडाधड कोसळत होत्या. आणि तो बारमधला माणुस गेल्याची बातमी समोर तर बातमीत तो फार मोठा बिल्डर असल्याची बातमी आणि गेल्याच वर्षी मुलीने आत्महत्या केल्याने वैफल्यग्रस्त झाल्याची अजुन बातमी तर मी उडालोच. नाव ओळखीचं वाटलं ते याच कारणामुळे. भयानक संताप स्वतःवर. माझ्यावर प्रेम करणारी ती बेढब आकारची मुलगी ह्याची मुलगी आणि तीही गेली आणि हाही गेला आता कायमचा. "रूप सुंदर असलं कि सुंदर मुलाशी लग्न होतं. . . . . " ह्या वाक्याचा अर्थ मला आता कळला होता. दोघांनाही वाचवु शकणारा मी एकलाही वाचवु शकलो नाही.

*****

किडे. . . . . किडे आहोत आपण, न सरपटणारे, दोन पायांवर चालणारे, दोन डोळ्यांनी कुठलाही गुन्हा सहजपणे बघून पुन्हा सहजपणे त्यावर सिगारेट चर्चा करणारे. या सिगारेट चर्चा पण फार भन्नाट असतात. सिगारेट संपली कि चर्चा संपते. माणसं तर चल बाय म्हणून मागे न बघताच निघून जातात पटकन. एकदिशीय वाटचाल. मच्छरांना चिमटीत धरून मारलं जातं तसच माणसांनाही धर्माच्या, जातीच्या चिमटीत धरून मारलं जातं की.

दहा दिवस झाले तरी आरोपी मोकाटच होते अजुन पण अजुन एक म्हणजे पोलिसांनी त्या मुलाच्या आईलाच दम देऊन गप्प राहायला सांगितलं होतं आणि दम वगैरे देऊन पुन्हा नाहीतर आईला आणि त्या मुलाच्या चुलात्यांना तुम्हीच तुमच्या मुलाला मारलं म्हणून तुम्हाला अटक करु असा आवाज करून पोलिस त्यांच्या घरातून निघून स्वतःचं कर्तव्य बजावायला गेलेले.

आम्ही आपले त्या परिसंवादात शांतपणे खुर्च्या व्यवस्थीत लावून भिंतीला टेकून ते परिसंवादातलं बोलणं ऐकत होतो. लोकं तावातावानं भन्नाट बोलत होती स्टेजवरची तर स्टेज समोरची पण तेवढ्याच तावातावानं ऐकत होती भन्नाट आणि मीपण ऐकत होतो पण उशीरा येणाऱ्या पाहुण्यांना बसवायला पण लागत होतं. माणसं मध्येच टाळ्या वाजवत होते तर निवेदकाने, "हा विषय टाळ्या वाजवायचा नाहीये, प्रत्येकाला चीड यायला हवी. " तर काहींनी त्यावरही टाळ्या वाजवल्या आणि इतरांनी वैतागून पाहिल्यावर खजील होऊन मान खाली घातली तर तिकडे स्टेजवर माणसं बोलतच होती आणि समोरची माणसं ऐकतच होती.

*****



चळवळीतल्या मित्रासोबत घरी निघालो परिसंवाद संपल्यावर तर वाटेत आख्या हा गप्पच चालत होता शांतपणे. मीपण शांतच होतो त्यामुळे. वाटेत माणसं मोबाइलवर बोलत होती आणि प्रत्येकाकडे वेळच नव्हता एकमेकांकडे पहायला.

कुठेतरी निघून जायला हवं भुर्रकन न बोलता आणि शांत बसून रहावं दाढी वाढेपर्यंत. उगाच कुठल्याही देवाला प्रसन्न न करता वाढू द्यावी आपली दाढी भरपूर आणि मग जगून जगून तरी काय करणार आपण म्हणून पटकन मरून जावं आणि कावळ्यांनी आणि उंदरांनी आणि सगळ्यांनीच जगावं मग आपल्या शरीरावर जमेल तितके दिवस. हाडांनी झिजुन मातीत मिसळून जावं.

*****

त्याच्या घरी पोहचलो आणि दोघेही शांतपणे बसलो. नंतर ह्याने पेन घेतला हातात आणि एक कोरा पेपर घेतला घरातला आणि म्हणाला, " हे जे कोरं पान आहे ना, ते म्हणजे हे प्रकरण. किती स्वच्छ आणि सोप्पं दिसतय ना? कि कधीही गुन्हेगार पकडला जाऊ शकतो इतकं. " आणि मग पानाचा चुरगाळुन बोळा केला आणि उलगडून दाखवला मला आणि मग म्हणाला, "इतकं गुंतागुंतीचं करून ठेवलय हे प्रकरण आपल्या संपूर्णच समाजव्यवस्थेने. " आणि मग जरासा शांत झाला. आणि पुन्हा म्हणाला, " वर्ष होऊनही आपण अजुनही त्या आपल्या अंधश्रध्देच्या विरोधात काम करणाऱ्याच्या हत्येकऱ्याला पकडू शकलो नाही, निमुटपणे श्रद्धांजली वाहत फिरतो आपण. सगळीच प्रकरणं इतकीच गुंतागुंतीची करून ठेवलीयेत. आपल्या भारतात सापशिडीचा अनिश्चित असा खेळ सुरु आहे, जिथे शंभराव्या स्थानावर आगोदरपासून कुणीतरी गर्दी आहे आणि तळातल्यांना मात्र शंभराव्यापर्यंत जाण्याची संधीच मिळतेय असं वातावरण. जागोजागी पेरलेले साप आता कुठल्या आकड्यांमधून उगवतील आणि आपल्याला खाऊन टाकतील हे कळणार पण नाही इतका बेमालुम मामला आहे सगळा. आपण फक्त श्रद्धांजल्या वाहत रहायचं आणि शंभराव्या घराला आशेने बघत रहायचं. "

हा बोलायला लागला कि इतका बोलतो कि थांबतच नाही आणि कधी कधी बोलतच नाही दिवस दिवस.

आता बोलतच होता भरभरून.

"म्हणजे बघ ना किती प्रगती केलीये आपण कि नुसत्याच श्रद्धांजल्या वाहण्यासाठी सामान्य जनतेला आणि महापुरुषांनाही मारलं जातं जीवानिशी. किती प्रगती झालीय ना आपली कि पूर्वी माणसं साथीच्या रोगाने आणि इंग्रजांच्या गोळ्यांनी मरायची तर आता लोकांनी शहरात गाडयाच इतक्या घेतल्यायत कि मरणासाठी आता पटकन कुणाचीही गाडी आपल्या अंगावरून गेली तरी आपण पटकन मरून आपलं कर्तव्य बजावायला हवं, तर तिकडे गावाकडे तर शेतकऱ्यांच्या आत्महत्येसाठी दुष्काळच दुष्काळ पेरून ठेवलाय शेताशेतात आणि मग शेतकरी मेल्यावरही शांतपणे चहाच्या सोबत बातम्या चावत बसतोय आपण. पुरुषांची सगळी ताकद लिंगातच आल्यागत बलात्कार आणि आपण मात्र श्रद्धांजल्या वाहत फिरतोय या देशात. दीड आठवडा झाला आणि बरीच आंदोलनं झाली तरी मुख्यमंत्र्यांना वेळच नव्हता तिकडे जायला. अजुन गेले नाहीत आणि मी या प्रकरणाचा सखोल अभ्यास करीन वगैरे वाक्य कॅमेऱ्यावर फेकताहेत मुख्यमंत्री बिनधास्त तर सखोल अभ्यास कुठल्या विहीरीत जाऊन करावा लागतो हेच आपल्याला माहित नाही म्हणून आपण फक्त श्रद्धांजल्याच वहा. "

नंतर खुप बोलून शांत झाला तो. तर मी आतून थोडासा विस्कटलो. पार बोळा झालो कागदाचा. तो म्हणाला, मी जरा झोपतो आडवा होऊन. " तर मी म्हणालो, "मी घरी जातो. " आणि निघालो आणि तो कडी लावून दाराच्या आत झोपी गेला असावा.



*****

तिथुन बाहेर पडलो तर माणसांचे लोंढेच्या लोंढे पाहिले आणि फारच एकटं वाटायला लागलं आतून. सगळीच माणसं मोबाइलवर बोलत होती नाहीतर गाणी ऐकत चालत होती. सिनेमाच्या थिएटरमधून कॉलेजच्या बॅगा खांद्यावर टाकून मुलं मुली बाहेर निघत होती.

मला ना कुणाशीतरी बोलावसं वाटत होतं आणि सोबत कुणीच नव्हतं. बिल्डरच्या त्या मुलीला हो बोलून सोबत घेऊन फिरलो असतो तर तिच्याशी तरी बोललो असतो भरभरून पण आता दोघेही निघून गेले आणि सोबत बाहुली घेऊन तरी कुठे कुठे फिरा ना. . . बाहुलीला कळतात माझ्या सगळ्या वेदना. लहान बहिणीसारखं समजून घेते ती मला. मी बोलताना बिलकुल बोलत नाही, ऐकत बसते शांतपणे.

मी चालतच होतो. मंदिराच्या समोर गर्दीचा प्रचंड भपका वाहत होता की पुजाऱ्यांचे पोट महिनाभर तरी उपाशी मरणार नाही. त्या गर्दीकडे काही भिकारी मुलं पैसे मागत होती काहीतरी खायला आणि गर्दीकडे त्यांच्यासाठी पैसेच नाहीत खिशात आणि भिकारी बिचारे होऊन आशेने हात पसरताहेत.

*****



घरी आल्यावर शेजारून चावी घेतली आणि घरात येऊन हातपाय धुतले तर शेजारची मुलगी येऊन तिच्या घरी जेवायला बोलवू लागली. मी भलताच आक्रसलो. याआधी कधी घरात गेलो नाही तिच्या तर मी आक्रसल्या अवस्थेत उत्तरच दिलं नाही म्हणून मग " आणते इथेच" म्हणत ती निघाली तर मी म्हणालो चला येतो जेवायला आणि जेवायला निघालो. तिच्या घरात फारसं सामानच नाही आणि तरीही ती मात्र मजेत असते दिसताना तरी. जेवलो आणि निघालो तर ती मुलगी मी जेवेपर्यंत गप्पच होती. च्यायला काही काही माणसांच्या आयुष्यात इतरांना सांगण्यासारखं काहीच नसतं हेच खरंय. माणुस इतका रिकामा कसा काय होत असेल? मी घरात येऊनपण हाच विचार करत राहिलो. मग बाहुलीला समोर घेतलं आणि तिला म्हणालो " गुड नाईट" आणि झोपीच गेलो पटकन स्वतःला दुमडून.

*****

भरदिवसा सगळ्या सावल्याच सावल्या फिरत होत्या उजेडात भडकपणे. एकमेकांना तुडवत, एकमेकांना हसत. काळ्या कुट्ट सावल्या. चेहरेच नव्हते सावल्यांना, नुसत्या काळ्या किर्र. . त्या सावल्यांमधून एक चेहरा होऊन पांढरी सावली चालु लागली सगल्यांनाच सांभाळत तर काळ्या सावल्या स्तब्धच झाल्या पटकन आणि मग कुजबुजु लागल्या एकाएकी आणि तो पांढरा रंग सहन न होऊन त्याच्यावरही धाव घेतली आणि हा रंग इथे नकोय म्हणून भांडू लागली तर ती पांढरी सावली शांतपणे स्वतःचा रंग सगळ्यांना देऊ पहात होती, पण सगळे जण वैतागत सुऱ्या- तलवारी घेऊन त्या सावलीला मारू लागले आणि मग सावली मरून गेल्यावर त्याचा अंत्यविधी करून तिलाही काळीकुट्ट राख करून शोक करू लागले भरमसाठ.

*****

स्वप्नांची संख्याच जास्त झालीये आत. सकाळी उठलं कि भरून आल्यासारखं वाटतं. सकाळ म्हणजे तरी स्वच्छ असावी तर ती वर्तमानपत्रातल्या राजकारणात काळवंडलेली. सूर्याने उगवावं तरी कसं स्वच्छ. . . ?
आंघोळ करून निघालो तर काही कांदापोहे खाणारे भेटले वाटेतच आणि मग पाच सहा दिवस बंद आहे गाडी म्हंटल्यावर सांगितलं कि, "आई गावी गेलीये. " तर मग भलतेच लाडात येऊन, "लग्नाचं ठरतय कि काय? " म्हणून फारच खिदळु लागले. मी खरं कारण सांगितल्यावर मात्र अरेरे म्हणत पेपर वाचुन त्यावर बोलु लागले आपापसात.
मी चळवळीतल्या मित्राच्या घरी गेलो तर हा अजुन शांतपणे झोपी होता घरात. दार उघडून ये म्हणून पुन्हा झोपीच गेला जमिनीवर तर मी त्याला उठवून येतो म्हणून निघालो पटकन.

*****

दिवसभर फिरुयाच म्हंटलं न जेवता आणि फिरत बसलो इकडे तिकडे. तिकीट न काढताच रेल्वेत प्रवास करून घेतला आणि मग तिकीट काढून सिनेमाला बसलो एका. तर पडद्यावर पुन्हा एकदा हिरोच्या हातून उगाचच पन्नास एक जण मार खाऊन पळून जात होते आणि मग माणसं खुश होत पॉपकॉर्न खात होती आणि कोपरऱ्यात मात्र एक मुलगा मुलीच्या छातीशी खेळत होता आणि पडद्यावर हिरो स्त्रियांचा मान ठेवलाच पाहिजे म्हणून एका दाढीवाल्या व्हिलनला उपदेश देत होता आणि व्हिलन सिगारेट फुकत बसला होता तर मध्येच एखादा कॉमेडियन पडद्यावर भंपक विनोद करत होता आणि माणसं हसत होती. तर कोपऱ्यात छातीशी खेळणं सुरूच आणि इंटरवलला पेप्सी पित बसले दोघेपण आणि पुन्हा सिनेमा सुरू पदद्यावर पण आणि कोपऱ्यातल्या खुर्चीवरपण. मी उठलो मध्येच आणि निघालो बाहेर तरी लोकांचं सिनेमा बघणं सुरूच.

बाहेर आलो तर तुडुंब गर्दी सरकत होती माणसांची आणि वाटेत एकदम मैत्रीणच भेटली कॉलेजमधली तर म्हणु लागली, " चहा पिऊया कुठेतरी. " आणि हॉटेलात गेलो दोघेही.

हि मैत्रीण दिसायला फारच सुंदर होती कॉलेजात. आता फारच वाढली होती अंगाने, पण सुंदर तर होतीच आताही.

म्हणाली, "कसा आहेस? "

तर मी म्हणालो, "बरा आहे. "

तर ती म्हणाली, "काय करतोस? "

तर मी म्हणालो, "काहीच नाही. "

तर भलतच नवल होऊन बसली ती.

म्हणाली, "तुला पोलिसांच्या व्हॅनमध्ये कोंबताना पाहिलं मी टि. वी. वर. "

मी काहीच म्हणालो नाही,

तर ती चहा पिताना, "लग्नं केलस कि नाही? " म्हणाली.

मी नाही म्हंटल्यावर तिने, "मला दोन मुलं आहेत. " म्हणाली. आणि चहाचं बिल देऊन निघलोच आम्ही बाहेर आणि मग "बाय" करून मैत्रीण गर्दीच झाली पटकन. मी तिला "बाय" करायचं राहूनच गेलं.

*****

संध्याकाळ झालेली तर घरी निघालो आणि घरी आल्यावर आई - वडील आल्याचं पाहिलं तर म्हंटलं बरच झालं. आई भिंतीला टेकून बाहुली मांडीवर घेऊन बसली होती आणि बाप खुर्चीवर पायाची घडी घालून तंबाखू मळत होता आणि टि. वी. बघत होता. माझा बाप काम करून घरी आल्यावर सदा न कदा टि. वी. बघत बसतो. आणि ह्याला काय मिळत असेल नुसतं टि. वी. बघून. मी लहानपणापासून बघतोय याला, खुर्चीवर त्याच बसून अजुन टि. वी. बघत बसतो मजेत.

सासू सुनेला छळत होती आणि सुन छळ सहन करत होती आणि आई बाप तो छळ बघत बसलेले.

आई म्हणाली, "तो चळवळीतला आलेला कुणीतरी, तुला बोलावलंय घरी. "

असं म्हंटल्यावर मी पाणी प्यायलो आणि निघालो भेटायला.

*****

सकाळी झोपलेला मित्र आता जागा होता आणि कपडे धुत होता मोरीत तर मी घरात आल्याचं त्याला कळलंच नाही आणि मीपण काहीच बोललो नाही.

हा कपडे धुऊन सुकत घालताना मला बघून, "आलास पण" म्हणाला.

मग बसला समोरच माझ्या आणि म्हणाला, "फार एकटं वाटायला लागलं रे. फारच उद्विग्न झालोय रे मी अचानक. म्हणून म्हंटलं बोलावं कुणाशीतरी आणि तुला बोलवायला घरी आलो. काहीच कळत नाही रे. "

मी म्हणालो, "चल कुठेतरी फिरुया शांतपणे. "

तर पटकन तयार झाला आणि निघालो पण आम्ही कुलुप लावून बाहेर.



*****

एका गटारावर बसलो होतो आम्ही समुद्रासमोर आणि शहरातलं सगळं घाण पाणी समुद्र सामावून घेत होता तर सूर्य मजेत समुद्रात बुडायला तयार होता. चणेवाले चणे विकत होते, पुरुष स्त्रियांशी खेळत होते आणि त्यांना बघणारे बघत होते आणि आम्ही दोघे या सगळ्यांकडे पाठ करून पार लांबवर बुडणाऱ्या सूर्याला बघत बसलो होतो. असं सगळं वातावरण झाल्यावर फारच गुदमरायला होतं.

"आत्महत्या करायला हवी मला, आत्महत्या. जीव फारच उगाचच्या उगाच फुकट झाल्यासारखा वाटतोय. म्हणजे कुणीच कुणाशी व्यवस्थित वागत नाही आणि तरीही सगळेच एकमेकाला खरा तो एकची धर्म वगैरे समजावताहेत, हे तर फारच बोगस झालंय ना? माणसाने जगायचं म्हणजे नेमकं काय करायचं तर जन्म घ्यायचा आणि आपली भाषा बोलायला शिकायची आणि शाळा शिकायचं आणि मोठं व्हायचं आणि पैसा मिळेल अशा ठिकाणी काम करायचं आणि लग्न करायचं आणि नागडं व्हायचं आणि नागड्या मुलांना जन्म द्यायचा आणि पैसा कमवत बायकोची हौस मौज पुरवत मुलांनाही शिकवायचं आणि मोठं करायचं आणि त्यातच कधीतरी मरून जायचं, ह्याला जगणं बिगणं कसं काय समजू शकतात माणसं. प्रत्येक गोष्टं कारणाशिवाय घडतच नाही असं कुणीतरी तत्वज्ञान मांडून ठेवलय तर मग माणसाची निर्मितीच का झाली विनाकारण? समज आता ही पृथ्वी तुकड्यातुकड्यात विखुरली आणि माणसं संपून गेली सगळी तरी काय बिघडणार आहे आपल्या कुणाचच, आपल्या कुणाच्याच जगण्याला काहीच अर्थ नाही, अर्थ आहे तो धर्माला, जातीला. साला मी मुंगीच्या जन्माला यायला हवा होतो. साखर खाता खाता मेलो असतो आणि मरता मरता पटकन समोरच्याला चावलं असतं कडाडून. साखर महाग झाली म्हणून उपोषणं केली नसती आणि साखर स्वस्त झाली म्हणून उगाच जास्त खाल्ली नसती आणि मेलो असतो आपसुक कुणी चिमटीत पकडल्यावर पण जरा तरी व्यक्त झालोच असतो की रे. पण मला मरावसं वाटतंय. आत्महत्या कराविशी वाटतेय. "

आत्महत्येने सुरुवात करून आत्महत्येवर संपवला विषय त्याने तर मला फारच भयानक वाटलं.

मी त्याला म्हंटलं, "पण आत्महत्या करणं तर पाप आहे. "

हे असं कायद्यातलं वाक्य वगैरे नको फेकुस आणि मग आत्महत्या करणं पाप आहे तर म्हणून मग आत्महत्या करणाऱ्याला मरेपर्यंत फाशीच दिली पाहिजे असाही कायदा करायला हवाच की. एखाद्या माणसाला दारू प्याविशी वाटते तर तो पितो, सेक्स करावासा वाटल्यावर करतो. एखाद्या माणसाला विनाकारण जीवानीशी मारावसं वाटलं

कि मारतो आणि त्यावर शिक्षा काय? तर आपला कायदा वर्षानुवर्षे काहीच करत नाही, गपगुमान तराजू धरून असतो. मग एखाद्याला आत्महत्या करावीशी वाटल्यावर त्याने केलीच आत्महत्या तर मग इतरांनी बोंब का ठोकावी उगाच? "
पोलीस जमिनीवर काठी आपटत, "चला चला, अकरा वाजले घरी निघा. " करत आम्हाला घरी निघायला सांगु लागले तर तेव्हा आम्हाला कळलं कि रात्रीचे अकरा वाजलेत आणि आम्ही अजुन आत्महत्याच करायच्या विषयावर बोलतोय. घरी निघालो तर एक भडक मेकअप केलेली बाई जवळ येऊन सोबत चालत, " बैठना है क्या? " विचारु लागली, तर हिच्यासोबत बसून काय करायचं उगाच म्हणून तिच्याकडे लक्षही न देता निघालो पुढे घरीच.

*****



प्रकरण फारच तापलेलं, तर दलितांच्या जीवाचं काही मोलच नव्हतं सरकारला आणि पोलीस तर त्याच्या आईलाच दोषी ठरवायला उताविळ झालेले . आईला दमदाटी करत होते पोलीस पण तिचा स्वतःचा मुलगा गेलेला आणि आधारासाठी कुणीच नव्हतं तिला, नवरा तीन वर्षापुर्वी गेलेला असल्याच हत्याकांडात आणि तो न्याय अजुन पेंडिंग होता आणि आता तर स्वतःच्या मुलाला मारण्याची गोष्ट तिच्यावर आलेली, हे तर भयानक.

*****



मोर्चा निघाला मंत्राल्यावर तर सगळेच कॉलेजला असलेले तरुण फारच जोरात नारे देत निघालेले. पार्कातून निघालेला मोर्चा मंत्रालयावर शेवट होऊन थांबला आणि मग सगळ्याच गाड्या ठप्प जागच्या जागी. तसे मुख्यमंत्री आणि गृहमंत्री फारच शुरपणे मंत्रालयाच्या बाहेर जमावासमोर उभे राहिले. आणि लोकशाहीचा अंत होऊ देणार नाही मुळीच असं बोलु लागले. कुणावर अन्याय होत असेल तर तो सहन केलाच जाणार नाही आणि सामान्यांनी भीती बाळगायची नाहीच मुळी असं बरळु लागले मिनीटभर तर प्रकरण तडीस कधी लावणार हाच आमच्याकडून प्रश्न तर त्या प्रश्नाला लवकरच असं उत्तर. तर मुख्यमंत्री सुरक्षेच्या गराड्यात उभे एकटक आणि बोलतच होते आणि दलितांवर अन्याय होऊच देणार नाही यापुढे असं म्हणून हात जोडून निघून गेले आत आणि मग आम्ही सगळे शांतपणे घरी जायच्या तयारीत.

*****

मी मित्रासोबत हुतात्मा चौकात उभा शांतपणे आणि आजुबाजुला भरमसाठ माणसं, ज्यांना माहितच नाही की कुणावर तरी अन्याय होतोय आणि ते मात्र मोबाइलवर मेसेज खेळत धन्य. कुणाशीच कुणाचं घेणं नाही की देणं नाही आणि सगळेच आजचा दिवस सुखी करण्याच्या नादात आणि वरच्यांनी उद्याचं भविष्यच हिसकावून घेतलय अनेकांचं त्याचं काय? आणि शहरात मात्र पावडरचे चेहरे आणि घामालाही सुगंधी करून ठेवलय इथे आणि किती गुळगुळीत केलेत आपण जगतानाचे रस्ते. या रिकाम्या गर्दीतून चालत सरळ रेल्वे स्टेशनला आणि तिथून चौपाटीवर बसलो तर तिथेही वेडीवाकडी माणसं थबकलेली एकाच ठिकाणी.

" जातीजातीवरून, धर्माधर्मावरून माणसं युद्धाची गंमत करून स्वतःला जोखु पाहतायत बेधडक आणि किती गर्व त्याचा आपल्याला. त्या मुलाची आई हॉस्पिटलमध्ये अडमिट करावी लागली आणि आपण अजुनही न्याय देऊ शकलोच नाही ना त्यांना ह्याचं राजकारण्यांना दुःखच वाटत नाहीये. ते आपले डोक्यावर खुर्च्या डोक्यावर घेऊन फिरताहेत भन्नाटपणे मोकळे होऊन नुसतीच आश्वासनं देत आणि फारच निर्धास्तपणे कारभार संभाळल्याचा आव आणत. टि. वी. वर तर काय आता ती बातमी खालच्या पट्टीपुरती धावतेय एकाच सरळ रेषेत आणि कुठला तो हिरो मेला म्हणून तीन तीन दिवस विशेष कार्यक्रम दाखवत कि तो गेल्याने पोकळी निर्माण झालीये भलीमोठी. आता ही पोकळी निर्माण होते म्हणजे नेमकं काय होतं? माणसं जन्माला येतातच कि भराभर आणि हिरो मेल्याने पोकळी? असो. "

एक भला मोठा श्वास आणि पुन्हा नंतर मग सुरु,

"मला जगायचय म्हणजे दुसरा मेलाच पाहिजे हा कुठला न्याय? आणि काय तर आपली स्वप्नं. एवढी मस्त पडताहेत माणसांना की भरपूर पाहिजे आपल्याला की गाड्या काय आणि मोबाइल काय आणि सिगारेटी काय आणि मोठी घरं आणि बक्कळ पैसा काय आणि फॅशनेबल कपड़े काय आणि सगळं कसं कसंही मिळालं पाहिजे पण मिळालं पाहिजेच.

हल्ली तर चिता पण एक हजार स्क्वेअर फुट असावी एवढी मोठी स्वप्नं पडु लागलियेत माणसांना कि चटकेच बसले तरी ते एक हजार स्क्वेअर फुटाचे असावेत. माणसं उपाशी मरतायत आज आणि आपण मात्र अन्न फ्रिजमध्ये ठेवून आठवडा आठवडा भरत जातो पोटात आणि खरच माणसं कशी पटकन मरतात न जेवताच. एखादी बंदुक यायला हवी हातात. आपले विचार मारून टाकले असते आणि मजा मारली असती पटकन.

*****



तुला सांगतो, माझा एक मित्र गटारात पडून मेला. सहावीत असताना, मीपण सहावीत. त्याला त्याच्या शरीराएवढीच जागा बस झाली मरायला.

*****

माझा मामा आणि बाप गप्पा मारत घरात होते आणि मला विचारू लागले तारीख काय ठरवुया. तर मी उठून घरातून चालता झालो तर मामा हसत "लाजला वाटतं" म्हणून बापाला टाळी देता झाला. बापही निर्लज्जपणाने टाळी घेता झाला.

*****

घरी जायलाच नको म्हणून काय करायचं असा विचार करत फिरत राहिलो संध्याकाळभर तर शेजारची मुलगी एका मुलाला धो-धो धोपटताना दिसली तसा मी झटक्यात तिथे गेलो तर तसं ती धोपटतच होती आणि बाकीचे सगळे कसा एक पुरुष स्त्रीकडून मार खातोय म्हणून मजा बघत होते आणि हसत होते, पण एक पुरुष जर स्त्रीला मारू शकतो तर स्त्रीपण मारुच शकते कि त्याला बेदम आणि मग त्यात बेदम काय हसण्यासारखं कि त्याला आणि बघा बघा पुरुष मार खातोय तर चुक केलीच पुरुषाने तर खायलाच हवा की स्त्री कडून मार.

मी पुढे होऊन मग त्या मुलाला बाजुला करत विचारलं मुलीला कि, "काय झालं मारायला ह्याला?"

तर ती म्हणाली, "रोज इथे रस्त्यावर उभं राहून मुलींना, बायकांना बघून नको ते कमेंट करतो आणि सारखं छातीकडे बघत राहतो स्त्रियांच्या. मी वाटच बघत होते, कधी एकदा माझ्याबरोबर असं करतोय. आज केलं, खाल्ला मार. "

आणि मग मला "इथे कुठे ? " विचारू लागली तर मी "सहजच" म्हणालो तसं ती निघून गेली. मार खाणारा मुलगा जखमा साफ करत जमिनीवरच बसला होता.

*****

चळवळीतल्या मित्राच्या घरी गेलो आणि म्हणालो, "चार दिवस काही जायचं नाही घरी. "
तर म्हणाला तो कि, "रहा इथेच, चार काय चाळीस दिवस रहा. माझ्या बापाचं काय जातय. "
आणि मग खलील जिब्रान वाचत बसला.
माझ्याकडे स्वतःचे कपडे फक्त अंगावर तर मग चार दिवस काय करायचं या विचारात असताना हा पुस्तकातून डोकं बाहेर काढत, "माझे कपडे घाल चार दिवस. " असं म्हणाला.
च्यायला, हा काय पुस्तक सोडून माझा चेहरा वाचत होता कि काय?
मग नंतर थोड्या वेळाने हा वाचून वाचून दमला की काय म्हणून खलील जिब्रान उशीखाली ठेवून छताकडे बघुच लागला सरळ सरळ.

*****



एकदा एका राजमहालात एक माणुस आला आणि राजासमोर दंडवत घालून उभा राहिला तर सगळीच माणसं त्याला पाहू लागली आणि मग सगळयांच्याच लक्षात आलं कि त्याचा एक डोळाच नाहीये आणि डोळ्यातून भयानक रक्त वाहतय.

राजाने विचारलं त्याला कि, "हे कसं झालं? "

"महाराज मी एक चोर आहे, " तो सांगू लागला, "आज अमावस्येचा दिवस म्हणून मी चोरी करायला निघालो. अमावस्या असल्याने भयानक अंधार असल्याने मी श्रीमंत सोनाराच्या दुकानात शिरण्याऐवजी चुकून विणकराच्या गेलो. अंधार होता आणि मला दिसलच नाही आणि मी विणकराच्या यंत्रमागावर जाऊन आपटलो आणि माझा डोळा फुटला, महाराज मला न्याय द्या, विणकराला शिक्षा करा महाराज. "

विणकराला बोलावण्यात येतं आणि तो आल्यावर न्यायदानाची प्रक्रिया पूर्ण करण्यासाठी विणकराचाही एक डोळा काढून घेण्यात यावा असं सांगण्यात येतं.

विणकर सांगू लागतो कि, "न्याय अन्यायाची चाड महाराजांना आहे, पण मला कपडे विणताना दोन्ही डोळ्याची फारच गरज आहे, पण माझ्या शेजारीच चप्पल शिवणाऱ्याचं दुकान आहे आणि त्याच्याकडे पण दोन डोळे आहेत पण त्याच्या धंद्याला त्याचे दोन डोळे बिलकुल शोभून दिसत नाहीत. "

राजा चांभाराला बोलावतो आणि त्याचा एक डोळा काढण्याचा हुकुम दिला जातो आणि चांभाराला स्वतःची बाजु काहीही न मांडू देता त्याचा एक डोळा काढून घेतला जातो.

आणि अशा रीतीने न्यायदानाची एक भली मोठी प्रक्रिया राजाच्या चतुराईने पटकन सुटली होती.

च्यायला खलील जिब्रान एक भन्नाट मिश्रण असला पाहिजे.

*****

आरोपी जवळपास कचाट्यात सापडलेच आहेत पोलीसांना. टि. वी. वर दाखवत होते तर हे जवळपास म्हणजे नेमकं किती जवळपास हेच कुणाला माहित नसतं. तपास अंतिम टप्प्यात आहे म्हणजे तपास पुर्ण होण्यासाठी किती टप्पे खावे लागतात?

"काही नाही रे, राजकीय संबंध गुंतलेत या प्रकरणात. "

"माणुस मारण्याचं परमीटच दिलय वरच्या जातीतल्या लोकांना. ते कुणी दिलय, कसं दिलय कुणास ठावुक? "

"नागडं करून मारलं पाहिजे आणि आपणच हॉस्पिटलमध्ये पाठवलं पाहिजे आणि अशा लोकांना मग जखमा भरेपर्यंत वाट पाहिली पाहिजे. जखमा भरल्या कि पुन्हा दिला पाहिजे मार साल्यांना. "

चहाच्या टपरीवर चहा पिता पिता नुसत्या चर्चा. बोलत नव्हते ते आम्ही दोघेच.

मग निघालो तिथून आणि तिथून निघताना पैसे पण दिले चहाचे.

मित्र म्हणाला, "आपण संध्याकाळी भेटु, माझं जरा काम आहे, वाटल्यास तू घरी जातोस आणि थांबतोस का आराम करत? " आणि तो चावी पुढे करू लागला तर मला तर फिरायचं होतं.

मग मी त्याला म्हंटलं, "की नाही मी घरी नाही जात आता, आणि भेटतो की तुला संध्याकाळी घरीच. "

आणि निघालो दोघेही एकटेच.

*****

चालता चालता वाटेतच एका फुटपाथला लागूनच एक शेड टाकून खाली वर्तमानपत्र ठेवलेले वाचायला, बसलोच वाचत.आरोपी सापडायची गोष्ट सुरु झाली होतीच म्हणा, पण त्या मुलाच्या आईची तब्येत खुपच खालावली होती वर्तमानपत्रात. मुलाला मारलं काही लोकांनी आणि अजुनही आरोपी पकडलेच नाहीत. वर्तमानपत्रं भरभरून बोलत होती निर्रथक आणि मी आपला बसलो वाचत विनाकारण.

कांदेपोहे विकत असेल ना तो मुलगा व्यवस्थीत? कुणास ठाऊक.

मी वाचतोय वर्तमानपत्र तर समोरून आई आणि मामाची दुसरी मुलगी सोबत जाताना दिसले. बापरे, किती लहान आहे ही. चौदा वर्षांच अंतर आमच्यात आणि घरचे मात्र लग्न करायचं ठरवताहेत बेधडक आणि आईलाही कळतच नाही कि हे चूक आहे. आई आणि मामाची मुलगी निघून गेले जवळूनच आणि मला पाहिलच नाही स्वतःच्या नादात आणि मी पाहूनदेखील हाकच मारली नाही.

तिथे पेपर वाचून पण फारच आळस आला आणि माणसं दोन रुपयांचा पेपरही वाचून झाल्यावर चोरून घेऊन जात होती बेधडक. दोन दोन रुपयांचा हिशोब मांडावा लागतो या देशात. की वर्तमानपत्रही चोरून घेऊन जावं लागतं वाचायला.

म्हंटलं चालत रहावं चालणं संपेपर्यंत आणि चालणं संपल्यावर शांतपणे आराम करावा.

लहानपणी शाळेत जाताना चालतच जायचो, गंमत वाटायची चालताना. अस्पष्ट आठवतंय सगळं, आईचं बोट धरून चालायचो तेव्हा माझ्या सगळ्या शरीराला ते बोट समजून, सांभाळून घ्यायचं तर आता तर आईचं ते बोटच कुठे हरवलं की काय?

*****

"वाल्मिकी आणि व्यास हे प्रचंड ग्रेट लेखक होते ना? म्हणजे बघ ना, एकच कलाकृती लिहिली आणि इतर काही लिहायची गरजच पडली नाही त्यांना गाजण्यासाठी. त्यांनी लिहून ठेवलं आणि आपण मात्र भांडत बसलोय त्याचाच आधार घेत आयुष्यभर. म्हणजे त्यांनी लिहून ठेवलेलं सगळं फारच खरं वाटू लागलं कि आपल्याला आणि मग सगळंच कसं भांडणाचं वातावरण. सगळंच कसं खऱ्यासारखं करून ठेवलय आणि त्या खोट्या असलेल्या खऱ्यासाठी आपण धावत जातो की एकमेकांच्या अंगावर आणि मारून टाकतो माणसांना. तिकडे त्या मनुने लिहून ठेवलं काहीतरी आणि त्या स्मृतीचे दाखले देत आपण इथे लढाया करतोय माणसा माणसांशी. अख्या समुहाला नाचवण्याचं काम केलं ह्या लेखकांनी, ही केवढी महान प्रतिभाशक्ती, कि माणसंच नष्ट होण्याची गोष्ट सांगतोय पिढ्यान् पिढ्या एकमेकांना".

मी त्याच्या घरात होतो आणि बोलतच होता हा माझ्यासमोर तर मी कान सावध करून सगळं भरून घेत होतोच कि कानात.

"सात जणांपैकी दोघांना पकडलय आणि त्या दोघांनाही माहित नाही कि उरलेले पाच जण कुठे आहेत, तर पोलीस कॅमेऱ्यासमोर फारच मोठं शौर्य गाजवल्याच्या खुणा सोडुन जाताहेत पण जर कायदा आणि सुव्यवस्था ठेवायची जबाबदारी आहेच त्यांच्यावर तर मग तो बिघडूच कसा देतात पैसे घेऊन ही मानसं. "

तो बोलतच होता आणि मी ऐकतच होतो.

*****

चार दिवस झाले मी घराबाहेर पडून आणि तरीही मला शोधण्यासाठी कुठलेच प्रयत्न झाले नाहीत कि काय? मी इतका बिनमहत्वाचा आहे ते मला आज कळलं.
मित्राला म्हणालो, "येतो रे पुन्हा, घरी जाऊन बघतो घरची परिस्थिति. "

*****

घरी आल्यावर कळलं कि शेजारच्या मुलीने काल आत्महत्या केली सकाळी आणि गल्लीतल्याच लोकांनी तिच्यावर अंतिम संस्कार केले.
तिचं दुःख जाणायचं राहूनच गेलं कि माझ्याकडून.
आयुष्यभर जगली तेवढं हसतच जगली बिचारी. पुरुषांचा तीटकारा यायचा तिला कि काय कोण जाणे? पण आयुष्याच्या शेवटी मात्र पुरुषांनीच केलं सगळं तिचं तर हे तर महाभयानकच आहे ना, की स्त्रियांवर हे सगळे सोपस्कर स्त्रियांनीच करायला हवेत पण आपला संपुर्ण देशच धर्माच्या, जातीच्या आणि संस्कारांच्या नावावर भंगार विचार पिकवत आलाय आणि आपण ते सहजपणे मान्य करत आलोय, आणि करतोय की अजूनपण.
बाप तोवर समोर उभा राहून, "लग्नाची तारीख ठरलीये. उद्या किंवा परवा पत्रिका छापायला जाऊयात. " म्हणून निघून गेला आणि शेजारची मुलगी आत्महत्या करून निघून गेली आणि आपण पत्रिका छापून लग्न करण्याच्या नालायक विचारात कसे काय गुंतू शकतो. बाहुली कोपऱ्यात होती शांतपणे. पण तिचे कान गळून पडले होते. च्यायला घरात मी नसताना चार दिवस घरातले एवढं काय बोलले असतील. हसु पण काळवंडलं होतं बिचारीचं.
"अगं ए वेडे, १८ वर्षाच्या मुलीशी नाही करणार मी लग्न. "
घरातून तडक बाहेर पडलो आणि काय करायचं कळेना तर बसलो फुटपाथवर. बाजुला एक भिकारी त्याच्या भिकारी बायकोला घेऊन बसलेला भीक मागत आणि मी त्यांच्या शेजारी. माझ्या बापाच्याच वयाचा होता. भिकाऱ्याच्या अंगावर एकही कपडा नव्हता. कमरेला चड्डी फाटकी तुटकी. त्याच्या बायकोलाही छाती आणि कंबर झाकण्यापुरताच कपडा. या दोघांनी लग्न कसं केलं असेल? पत्रिका छापल्या असतील का? किंवा लग्न न करताच एकमेकांना सोबत केली असेल आयुष्यभर? तसं तर साला, या आयुष्यात आहे काय आणि मानवजातीची निर्मिती का झालीये कळतच नाही आणि मानवजात असताना अजून जात आणि धर्म आणि ह्याव आणि त्याव निर्माण करून काय मिळवलय माणसाने?

*****

घरी आलो आणि भरू लागलो कपडे एका बॅगेत तर बाप होताच घरात आणि विचारु लागला कुठे निघालास तर मी पण घर सोडून म्हणू लागलो.
तर बापाने, "लग्न जमवलय आणि पंधरा दिवसांवर आलय आणि तू माझं नाक खाली करायला घर सोडून पळून चाल्लाय". म्हणून आईवरून शिव्या हासडून मला मारू लागला आणि मग आई मध्ये पडली तर तिलाही शिव्या हासडून मारू लागला तसं आई पटकन कोसळलीच जमिनीवर आणि निपचित पडली गार.
तसं तिला उचलून हॉस्पिटलमध्ये गेल्यावर उपचार वगैरे झालेच सुरू.
दुसऱ्या दिवशी टि. वी. वर बघितलं कि त्याची आई गेली आणि दोनच आरोपी पकडून ठेवलेत पोलिसांनी तर बाप जवळ आला आणि सांगू लागला कि, " तुझी आई गेली. "
तर मी बापाला म्हंटलं कि, " हो आत्ताच कळलं टि. वी. वर. "
तर बाप चमत्कारीक होऊन बघतच सुटला माझ्याकडे.

*****

आईला अग्नी दिल्यावर मग घरी आल्यावर बाप म्हणाला, "एक दोन महिन्यात करुया लग्न. "
तर मी आपला बापाचा काळ पुढे सरकतच नाही म्हणून वैतागू लागलो.
"तुम्ही महाभयानक माणुस आहात आणि नालायक आणि बेशरम माणुस आहात. तुम्हाला समजुनच घेता येत नाही कुणाला, तुम्ही मरण्याच्या लायकीचे आहात, आईने जगायला हवं होतं. "
तसं बापाने पुन्हा माझ्या थोबाडीत ठेवून आईवरून शिवी दिली. आई गेल्यावरही कायमचं आईवरूनच शिवी?
आणि मग, "तुला इतकी वर्षे पोसला, खाऊ पिऊ घातलं, शिक्षण दिलं, अंगावर कपडे दिले आणि तू? "
मग माझं टाळकच सटकलं आणि नकोय मला तुमचं काही म्हणून मी अंगावरचे कपडे काढून नागडा झालो आणि धावत सुटलो रस्ता असेल तिकडे.
मागे बापासकट बरीच माणसं, "पकडो पकडो, पकडा पकडा" करत धावत होती.
पळा पळी हा आपला राष्ट्रीय खेळ आहे. राष्ट्रीय खेळ म्हणजे मानव नावाच्या समुहचा राष्ट्रीय खेळ.
धावता धावता एका उघड्या गटारात पडलो मी नागडा. तर मागून माणसं येऊन गटारातून काढून मारूच लागली मला. त्यांना वाटलं मी चोरच आहे की काय? तर बापाने सोडवत मला ओढत घरी घेऊन जाऊ लागला तसा मी हाताला हिसडा देऊन भिकाऱ्याच्या बाजूला त्यांचा मुलगा होऊन बसलो आणि मानसं मला ओढून घेऊन जाऊ लागली घरी. मी पुन्हा निसटलो आणि धावू लागलो जोरात आणि थडकलो एका विजेच्या खांबावर आणि मग तडक इथे.

*****

"डॉक्टर म्हणतात तुझ्या डोक्यावर परिणाम झालाय माझ्यासारखाच, मलाही हेच सांगतात. " तो सांगु लागला.
आता माझ्या अंगावर कपडे आहेत आणि मी हॉस्पिटलमध्ये. समोर तो, ज्याला मी पुर्वी कधीच पाहिलं नव्हतं. पण भेटल्यावर फारच ओळखीचा वाटला आणि म्हणून सांगितलं त्याला हे सगळं.
"ते जाऊ दे, " मी त्याला म्हणालो, "तुझी पण एखादी गोष्ट असेलच कि, ऐकव ना मला. "
तो शांतपणे हसत राहिला आणि म्हणाला, "सगळ्याच वेड्यांची गोष्टं एकसारखीच असते रे. आपण शहाणे थोडीच आहोत. शहाणी माणसं शहाणपणाच्या गोष्टी करत देवाशी संवाद साधण्याचा प्रयत्न करतात आणि वेडी माणसं वेडी असल्याचा कुठलाही गर्व न बाळगता स्वतःशी संवाद साधण्याचा प्रयत्न करतात. कधीतरी करायलाच हवा कि रे स्वतःशी संवाद. "
आणि मग सगळेच आम्ही आपापसात गप्पा मारत बसलो शांतपणे न बोलता.

********

# ई साहित्य प्रतिष्ठान

वाचन न करणारा समाज हा हळू हळू संवेदनाहीन होत जातो.

म्हणजे वाचन करणारे फ़ारच संवेदनशील वगैरे असतात असं नाही. पण माणसाने वाचलं पाहिजे.

म्हणून ई साहित्य प्रतिष्ठान मोबाईलवर वाचता येतील अशी पुस्तकं विनामूल्य देत असतं. लक्षावधी लोकांपर्यंत ती पसरतात आणि पसरत रहातात. व्हायरल होत रहातात. त्यांच्या त्यांच्या कुवतीनुसार. आणि वाचकांच्या रुचीनुसार. अभिरुची वगैरे फ़ारच मोठे शब्द आहेत.

तर आपण जास्तीत जास्त वाचक जमा करूया. महाराष्ट्रात निदान सहा कोटी साक्षर असतील. त्यातल्या एक कोटी लोकांपर्यंत तरी पोहोचूया.

तुम्ही फ़ार टेन्शन नका घेऊ. फ़क्त आपल्या आसपासच्या दहावीस लोकांचे मेल पत्ते कळवा.

तुम्हाला आम्ही VIP सभासद बनवू.

आपले विनम्र विश्वासू

टीम ई साहित्य प्रतिष्ठान